






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






**संपादक :** प्र.ना. परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११००७.
दूरध्वनी (०२०) २५६९४६१७

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२.
दूरध्वनी (०२०) २४४८६०१५

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११०५१.
दूरध्वनी (०२०) २४३४८७५६

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी - **संस्थेला** रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-, **व्यक्तीला** रु. १००/-पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- **परदेशात** अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** (पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धे पान रु. १,५००/-, पाव पान रु. ८००/-, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

## अनुक्रमणिका



मुखपृष्ठावरील रेखाचित्र : अनिल अवचट

मांडणी : विनय सायनेकर, सुप्रिया खारकर

# आवाहन

(१) मराठीबद्दल आस्था असणाऱ्या, मराठीचे अध्ययन-अध्यापन करणाऱ्या, मराठीच्या विकासासाठी प्रयत्न करू इच्छिणाऱ्या सर्वांपर्यंत 'भाषा आणि जीवन' हे नियतकालिक आणि ते प्रकाशित करणाऱ्या 'मराठी अभ्यास परिषदे'चे कार्य पोचणे आवश्यक आहे हे आपल्यालाही पटेल. त्यासाठी आपणही काही करू शकता. आपण रु. १०००/- (किंवा त्या पटीने) देणगी दिलीत तर 'भाषा आणि जीवन'चे अंक दहा (किंवा त्या पटीत) संस्थांना (महाविद्यालये, विद्यापीठे यांचे मराठी विभाग इ.) किंवा व्यक्तींना एक वर्षभर पाठवले जातील. त्यांना पाठविल्या जाणाऱ्या पत्रात आपल्या देणगीचा उल्लेख केला जाईल आणि 'भाषा आणि जीवन'चे वर्गणीदार होण्याचे आणि (व्यक्तींना) 'मराठी अभ्यास परिषदे'चे आजीव सभासद होण्याचे आवाहन केले जाईल. अंक ज्यांना पाठवायचे त्यांची नावे व पत्ते आपण देऊ शकता किंवा ते काम आपण आमच्यावर सोपवू शकता.

या योजनेचा प्रारंभ श्री. विजय पाध्ये यांच्या रु. १०००/-च्या देणगीतून होत आहे. आपल्या सहभागाची आम्ही वाट पाहात आहोत.

(२) **परिषदेचे संकेतस्थळ :** दि. १ मे २००८ रोजी परिषदेचे संकेतस्थळ सुरू झाले आहे. त्याचा पत्ता (www.marathiabhyasparishad.com). या संकेतस्थळावर परिषदेची घटना, पदाधिकारी, कार्यक्रमांची छायाचित्रे, 'भाषा आणि जीवन'चे अंक, सभासदवर्गणी इत्यादी माहिती उपलब्ध आहे. सभासदांनी या संकेतस्थळावरील मजकुराचे परिशीलन करावे, आपला अभिप्राय कळवावा आणि सूचनाही कराव्यात.

**- प्र. ना. परांजपे**
अध्यक्ष, मराठी अभ्यास परिषद
संपादक, 'भाषा आणि जीवन'

---

**लेखकांना आवाहन :** पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे : मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

---



अनुक्रमणिका

# नव्या शतकाची नांदी

'भाषा आणि जीवन'चा एकशेएकावा अंक वाचकांच्या हाती देताना आम्हांला समाधान वाटत आहे. यानिमित्ताने थोडे सिंहावलोकन करणे योग्य ठरेल. १ जानेवारी १९८२ रोजी पुणे येथे स्थापन झालेल्या 'मराठी अभ्यास परिषदे'ने जून (पावसाळा) १९८३ पासून 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक सुरू केले. तेव्हापासून आजपर्यंत हे प्रकाशन सातत्याने चालू आहे.

सुरुवातीचे प्रमुख संपादक होते आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भाषावैज्ञानिक डॉ. अशोक रा. केळकर (कार्यकाल : वर्ष १, अंक १ ते वर्ष ८, अंक १). त्यानंतरचे प्रमुख संपादक व त्यांचा कार्यकाल पुढीलप्रमाणे आहे : डॉ. कल्याण काळे (वर्ष ८, अंक २ ते वर्ष १५, अंक ४), डॉ.विजया देव (वर्ष १६, अंक १ ते वर्ष १८, अंक ४), डॉ. मृणालिनी शहा (वर्ष १९, अंक १ ते वर्ष २२, अंक ४). वर्ष २३, अंक १ पासून प्रा. प्र.ना. परांजपे प्रमुख संपादक आहेत. प्रमुख संपादकांना संपादकमंडळातील इतरांचेही सहकार्य मिळते.

पहिल्या अंकाची पृष्ठसंख्या छत्तीस आणि किंमत दहा रुपये होती. या दोहोंमध्ये वाढ होतहोत आज अंकाची पृष्ठसंख्या ७२ ते ८० आणि किंमत रु. २५/- झाली आहे. सुरुवातीला अडीचशेच्या आसपास असलेली वर्गणीदारांची संख्या आता हजाराच्या जवळ पोहोचली आहे. या नियतकालिकाला १९९५मध्ये महाराष्ट्र फाउंडेशनकडून मिळालेला वैचारिक नियतकालिकाचा पुरस्कार म्हणजे समाजमानसात त्याला मिळालेल्या प्रतिष्ठेची पावतीच आहे. मात्र अजूनही महाविद्यालयीन विद्यार्थी, तरुण अध्यापकवर्ग, आणि नागरी व ग्रामीण वाचनप्रेमी वर्ग यांच्यापर्यंत पोहोचण्याचे लक्ष्य आम्हांला गाठायचे आहे आणि त्यासाठी आमचे प्रयत्नही चालू आहेत.

वाचकांचे वर्तुळ भाषाभ्यासकांपुरतेच मर्यादित न राहता त्यात सर्वसामान्य वाचकही सहभागी व्हावेत म्हणून आम्ही प्रयत्नशील आहोत. भाषाभ्यासकांना उपयुक्त अशी साधनसामग्री (उदाहरणार्थ भाषाशास्त्रीय लेखन, संशोधन-अहवाल, भाषाविषयक लेखनसूची इत्यादी) जशी अंकात असते, तशीच सर्वसामान्य वाचकांना स्वारस्य वाटावे

अशी लेखनसामग्री (उदाहरणार्थ रंजक पानपूरके, हलक्याफुलक्या शैलीतील भाषा-विषयक निरीक्षणे, भाषेचे विभ्रम टिपणारे लेखन, पुस्तक-परीक्षणे इत्यादी) देखील त्यात समाविष्ट असते.

भाषा हा सर्वांच्याच जिव्हाळ्याचा विषय आहे. भाषेचे जीवनानुभवाशी साक्षात नाते असते. 'भाषा आणि जीवन'च्या पहिल्या अंकाच्या संपादकीयात म्हटल्याप्रमाणे जीवनाचा अनुभव घेण्याची ज्याची त्याची लकबच अखेर एक भाषिक लकब असते! भाषा आणि जीवन यांच्यातील अनेकपदरी नात्याचा सर्वसामान्य वाचकांना प्रत्यय येत असतो तर त्याच्यातील गुंतागुंत अभ्यासकांना जाणून घ्यावीशी वाटते. भाषा ही लोकव्यवहाराचे साधन असते, ज्ञानव्यवहाराचे माध्यम असते. ती संस्कृतीची वाहक असते आणि कलात्मक निर्मितिव्यवहारात ती जणू अनुभवाचे द्रव्य असते. व्यक्तीच्या भावजीवनात ती भावना, विचार व संवेदना यांचे केंद्रच असते. भाषेच्या अशा जीवनव्यापी अस्तित्वाचे काही पैलू 'भाषा आणि जीवन'च्या अंकांमधून उलगडले जातात, असे वाचकांना आढळेल.

भाषेचा शिक्षणक्षेत्राशी घनिष्ठ संबंध असतो. त्यामुळे प्रमाणभाषेचे अध्यापन, पाठ्यपुस्तकांचे मूल्यमापन, अभ्यासक्रमात मराठीचे स्थान या विषयांवरील लेखन 'भाषा आणि जीवन'मध्ये देण्यात येते. मराठीतून शिकवणारा शिक्षक हा मराठीचाही शिक्षक असतो, हे लक्षात घेऊन विविध सामाजिक शास्त्रांचे मराठीतून अध्यापन करताना येणाऱ्या अडचणींची चर्चा अंकात होत असते. त्याचबरोबर त्या त्या शास्त्रांमधील परिभाषानिर्मितीच्या प्रक्रियेला गती देणारे लेखनही अंकात समाविष्ट असते. विविध ज्ञानक्षेत्रांशी संबंधित पारिभाषिक संज्ञांच्या सूचीचा अंतर्भावही अंकात आवर्जून केला जातो. शिक्षणविषयक समकालीन प्रश्नांना भिडण्याचे आव्हान 'भाषा आणि जीवन'ने वेळोवेळी स्वीकारले आहे. 'पहिलीपासून इंग्रजी', 'शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल' अशा बाबींचा साधकबाधक विचार तज्ज्ञांनी केला आहे.

राजभाषा मराठी ही सक्षम 'ज्ञानभाषा' व्हावी, यासाठी असे प्रयत्न करीत असतानाच ती सर्वांच्या तोंडी सहज रुळेल, अशी 'लोकभाषा' व्हावी या दिशेनेही 'भाषा आणि जीवन'ने पावले उचलली आहेत. लोकशिक्षण विशेषांक (वर्ष १०, अंक ४ - संपादनसंयोजन : आशा मुंडले) याचे प्रत्यंतर देईल. न्यायालये, कार्यालये अशा क्षेत्रांमधील प्रशासकीय मराठी; वैद्यकक्षेत्र, प्रसारमाध्यमे, मुलाखती इत्यादी क्षेत्रांमधील व्यावहारिक मराठी यांविषयीचे भाषिक अनुभव आणि मार्गदर्शन यांना अंकात स्थान मिळाले आहे. मराठीला विकासाचा मोठाच पल्ला अजून गाठायचा आहे, याचे भान त्या लेखांमधून येते. प्र.ना. परांजपे यांची 'मराठीच्या विकासाच्या वाटा' ही पाच



अनुक्रमणिका

भागांतील संपादकीय लेखमाला यादृष्टीने उद्‌बोधक ठरेल.

अंकामध्ये भाषेचा सामाजिक अंगाने विचार करणारे लेख तुलनेने अधिक प्रमाणात आढळतात. प्रमाणभाषेचे मध्यवर्ती स्थान मान्य असतानाच इतर बोलींविषयी 'भाषा आणि जीवन'ला आस्था आहे. अहिराणी, झाडी, वऱ्हाडी, सौराष्ट्री अशा प्रादेशिक बोलींबरोबरच वैदू, कोकणा, कैकाडी, भाट, आदिवासी अशा समाजविशिष्ट बोलींची आम्ही दखल घेतली आहे. इतकेच काय, मूकबधिरांच्या भाषेचाही विचार अंकात झाला आहे. 'शालेय मराठी आणि झोपडपट्टी' (विजया चिटणीस, वर्ष २, अंक १) 'सर्वनामांचे समाजशास्त्र' (राजीव साने, वर्ष २, अंक २) 'सूनबाईंचे भाषाशिक्षण' (द.दि. पुंडे, वर्ष २०, अंक ४), 'म्हणी, सुभाषितं, अवतरणं' (कल्याण काळे, वर्ष २, अंक ३), 'जातीची चिवट भाषा' (मृणालिनी शहा, वर्ष १५, अंक २), 'एका संकेतव्यवस्थेचा अनुभव' (विजया देव, वर्ष २१, अंक ३) आणि बालभाषेविषयीची निरीक्षणपर लेखमाला (नीलिमा गुंडी) अशा काहींचा या संदर्भात उल्लेख करता येईल.

'मराठी वाचकांच्या भाषाविषयक गरजा पूर्ण करणे हे मराठी अभ्यास परिषदेचे उद्दिष्ट असले तरीही 'कुठलीही भाषा ही एखाद्या राज्याची राजभाषा असली तरी ती त्या राज्यापुरतीच मर्यादित नसते' हे तत्त्व संस्थेने स्वीकारले आहे; तसेच 'स्वत:च्या भाषेचे सामर्थ्य व मर्यादा इतर भाषांशी तुलना केल्याने अधिक प्रमाणात लक्षात येतात' ही वस्तुस्थिती सतत समोर ठेवली आहे. त्यामुळे भाषिक अस्मितेच्या संकुचितपणाच्या कक्षा ओलांडायला प्रवृत्त करणारे लेखन 'भाषा आणि जीवन'मध्ये येते. गोवा, मध्यप्रदेश, मदुरै इत्यादी ठिकाणच्या मराठीच्या स्थितिगतीविषयी यात विचारविनिमय आढळतो. तसेच तेलुगु, हिंदी, संस्कृत, इंग्लिश इत्यादी भारतीय भाषांमधील उच्चारण-संकेत, त्यांचे व्याकरण, त्यांतील चुकांचे विश्लेषण याविषयीचा अभ्यासही आढळतो. साहित्याबरोबरच व्याकरण, भाषाविज्ञान, मुद्रणकला, ग्रंथपालनशास्त्र, संख्यालेखन, नाटक-चित्रपट इत्यादींशी संबंधित भाषाव्यवहाराच्या विस्तारणाऱ्या जगाचे भान 'भाषा आणि जीवन'ने बाळगलेले आहे.

विशेष म्हणजे 'धन परक्याचे', 'वसा आंतरभारतीचा' या सदरांच्या माध्यमातून इतर भारतीय व परकीय भाषांमधील अनुवादित कथा, कविता, लेख इत्यादी साहित्य यात देण्यात येते. मराठीचे अध्ययन व अध्यापन करणाऱ्या परभाषक मंडळींच्या अनुभवांनाही यात स्थान दिले जाते. या मंडळींना मराठीच्या ज्या वेगळ्या कंगोऱ्यांचे दर्शन घडते, ते आपल्याला चकित करते. डॉ. मॅक्सिन बर्नसन यांचा 'जीव घाबरा करणारी भाषा' (वर्ष २, अंक १) आणि इरीना ग्लुश्कोवा (रशियन अभ्यासक) यांचा 'मराठी भाषेतील आंबटगोड धक्के' (वर्ष ७, अंक १) हे लेख यादृष्टीने वाचनीय आहेत.

भाषेचे सांस्कृतिक मूल्य ठसवणाऱ्या 'भाषा आणि जीवन'च्या अनुवादविशेषांकांचा (संपादक : अंजली सोमण) येथे खास उल्लेख करायला हवा.

अंकातील इतर काही सदरांचा उल्लेखही अनाठायी ठरणार नाही. 'पुनर्भेट' सदरातून भाषिक परंपरेचे सत्त्व वाचकांपर्यंत पोहोचवले आहे. 'भाषाविचार'मधून विष्णुशास्त्री चिपळूणकर, हरिभाऊ आपटे, डॉ. श्री.व्यं. केतकर, वि. वा. शिरवाडकर, वगैरेंच्या भाषेचा अभ्यास सादर केला आहे. 'दखलयोग्य'मधून भाषाक्षेत्रातील ताज्या घडामोडींकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे. 'शब्दायन'मधून शब्दाच्या अनेक अर्थछटा सांगून भाषेचे भान तल्लख राहील याची खबरदारी घेतली आहे. अंकांतील गुणग्राहक आणि काही वेळा परखड पुस्तक परीक्षणांचाही विशेष उल्लेख केला पाहिजे. अशी परीक्षणे आता अन्यत्र सहसा वाचायला मिळत नाहीत.

'भाषा आणि जीवन'मध्ये सुरुवातीपासून सातत्याने लेखन केलेल्या काहीजणांचा नामनिर्देश करायला पाहिजे. उदाहरणार्थ : मा.ना. आचार्य, कृ.श्री. अर्जुनवाडकर, मिलिंद मालशे, ब्रह्मानंद देशपांडे, द.भि. कुलकर्णी, द.न. गोखले, गौरी देशपांडे, वा.के. लेले, हे.वि. इनामदार, विद्युल्लेखा अकलूजकर, सुमन बेलवलकर, शरदिनी मोहिते, मनोहर राईलकर, दिलीप धोंडगे. अलीकडच्या काळात माणिक धनपलवार, विश्वनाथ खैरे, जया परांजपे, विद्यागौरी टिळक, शुभांगी पातुरकर, शिवाजी पाटील, उमाकांत कामत, कैलास सार्वेकर, केशव देशमुख, प्रशांत बागड, वासुदेव वले, विजय पाध्ये प्रभृती लेखकमंडळींची भर पडली आहे. भाषाभ्यासाच्या विविध अंगांकडे लक्ष वेधणाऱ्या विषयांची यादी अंकात देऊन आम्ही लेखकांना लिहिण्यासाठी आवाहन करतो. त्याला जुन्या नव्या लेखकांकडून अधिक मोठ्या प्रमाणावर प्रतिसाद अपेक्षित आहे.

'भाषा आणि जीवन'ला जिज्ञासू वाचकांकडून वेगवेगळ्या प्रकारे सहकार्य मिळते. वाचकांशी असलेले आत्मीयतेचे नाते ही अंकाची जमेची बाजू आहे. सुरुवातीला 'ठरावीक लेखकमंडळींमुळे अंकाची 'गटपत्रिका' होईल' हा जागरूक वाचकांनी वेळीच दिलेला धोक्याचा इशारा असो किंवा अंकातील चुका संपादकांच्या लक्षात आणून देण्यातील काटेकोरपणा असो – त्यातील वाचकांची आस्थाबुद्धी महत्त्वाची ठरते. 'शंकासमाधान', 'ज्याची त्याची प्रचीती', 'सादप्रतिसाद' अशा सदरांमधून वाचक अंकात सहभागी होतात. एखादा 'बहुश्रुत' वाचक सादाला प्रतिसाद देत 'परार्ध'चा अर्थ कळवतो; तर एखादा 'ओ.के.'(O.K.)ची कुळकथा सादर करून इतरांच्या माहितीत भर घालतो. वाचकांच्या कुतूहलाचे भरणपोषण अंकातून सातत्याने चालू असते. शब्दांच्या व्युत्पत्तीचा शोध घेणारे यातील लेखन वाचकांचे कुतूहल तेवते ठेवते. 'सडासंमार्जन', 'कानडा विठ्ठलु', 'रीरी म्हणजे पितळ' अशा शब्दांविषयीची अंकातील

रंगलेली मतमतांतरे वाचनीय आहेत. 'कापावे की चिरावे ?' हा प्रश्न (वर्ष ८, अंक ४) आमच्या अंकाच्या पानावर कधी नाट्यपूर्ण बनतो, तर कधी 'प्राण्यांना कसे हाकलतात' याविषयीच्या जुन्या पाठ्यपुस्तकातील कवितेचा बालबोध सूर भाषेच्या बारकाव्यांमुळे नव्याने लक्ष वेधून घेतो. (वर्ष ७, अंक ४)

'भाषा आणि जीवन'ची मुखपृष्ठेही वैशिष्ट्यपूर्ण असतात. काव्यातील अवतरणे, र.कृ. जोशी यांची सुलेखने, अनिल अवचट, शाम देशपांडे, बालम केतकर, वसंत आबाजी डहाके यांची रेखाचित्रे, शि.द. फडणीस यांची व्यंग्यचित्रे, विनय सायनेकर व सुप्रिया खारकर यांची संगणकीय अक्षरचित्रे यांतून भाषेतील दृश्यात्मकता प्रभावीपणे व्यक्त झाली आहे. रौप्यमहोत्सवी वर्षांतील अंकांच्या मुखपृष्ठांवर ज्येष्ठ भाषावैज्ञानिकांना स्थान मिळाले आहे.

प्रस्तुत 'संपादकीया'साठी 'नव्या शतकाची नांदी' या शीर्षकाची योजना करण्यामागे विशेष प्रयोजन आहे. अंकांचे एक शतक संपवून या अंकाबरोबर आम्ही नव्या शतकाला प्रारंभ करीत आहोत एवढाच मर्यादित अर्थ आम्हांला अभिप्रेत नाही. नव्या - म्हणजे एकविसाव्या - शतकांतील आव्हानांचीही जाणीव आम्हांला आहे, ही बाबही या शीर्षकातून आम्हांला अधोरेखित करावयाची आहे. जागतिकीकरणामुळे मराठी भाषेपुढे (आणि मराठी भाषकांपुढे) अनेक आव्हाने उभी राहात आहेत. जगभर पांगणाऱ्या मराठी भाषकांची अस्मिता मराठी भाषेमध्ये (आणि तिच्यातून व्यक्त होणाऱ्या संस्कृतीमध्ये) सामावलेली आहे; पारंपरिक तंत्राच्या लेखन व मुद्रणामुळे तिच्यावर मर्यादा येण्याची शक्यता आहे याचे भान मराठी अभ्यास परिषदेला व 'भाषा आणि जीवन'ला आहे. म्हणूनच आम्ही नुकतेच (म्हणजे १ मे २००८ या दिवशी) www.marathiabhyasparishad.com हे संकेतस्थळ सुरू केले आहे. सभासदांशी, वर्गणीदारांशी संपर्क साधणे, त्यांना कार्यक्रमांची आमंत्रणे पाठवणे, अंक व अन्य उपयुक्त माहिती व मजकूर उपलब्ध करून देणे व दूरदूरच्या (अगदी दूरदेशीच्या सुद्धा) मराठी माणसांच्या भाषिक गरजांचे भरणपोषण करणे या संकेतस्थळामुळे आवाक्यात येईल असा आम्हांला विश्वास आहे. अर्थात त्यासाठी मनुष्यबळ, आर्थिक बळ व जागा पुरेशा प्रमाणावर उपलब्ध होणे आवश्यक आहे. पण आव्हाने अवघड आहेत म्हणून हातपाय गाळून निष्क्रिय बसण्यापेक्षा आपल्या परीने प्रयत्न सुरू करणे हेच मराठीपणाचे लक्षण आहे. त्याच जिद्दीने १९८१ मध्ये मराठी अभ्यास परिषदेची स्थापना झाली; १९८२ मध्ये 'भाषा आणि जीवन'चा प्रारंभ झाला; आणि आता या अंकाबरोबर आम्ही नव्या शतकाची नांदी करीत आहोत. ■

नीलिमा गुंडी

# माहितीसाठी

(१) 'पाठवार मोजलं तर...'

'भाषा आणि जीवन'च्या उन्हाळा २००८ (वर्ष २६, अंक २) या अंकात नंदिनी अविनाश बर्वे यांचा एक लेख 'दखलयोग्य' या सदरात उद्धृत करण्यात आला आहे. (पृ. ५६ ते ५९). त्यामध्ये त्यांनी अशी तक्रार केली आहे की सध्याच्या १०वीच्या पाठ्यपुस्तकातील श्री. वामन होवाळ यांच्या कथेतील एक वाक्यार्थ समजत नाही. (पृ. ५८) वाक्यार्ध असा :

''पाठवार मोजलं तर मुंडा हात भरंल की,''

मी श्रीमती बर्वे यांची तक्रार श्री. होवाळ यांच्या कानावर घातली. ते म्हणाले की 'पाठवार' म्हणजे पाठ, संपूर्ण पाठ आणि 'मुंडा हात' म्हणजे पंजापासून कोपरापर्यंतचा हात. कथेतील स्त्रीचा बांधा थोराड आहे हे या वाक्यात सांगितले जाते. त्या स्त्रीची पाठ मोजण्याचे माप म्हणून 'मुंडा हात' हा शब्दप्रयोग आला आहे.

(२) त्याच अंकाच्या (उन्हाळा २००८) मलपृष्ठावरील कविता 'मूर्तकविता' (कॉंक्रीट पोएट्री') या कविताप्रकारातील असून त्या र.कृ. जोशी यांच्या आहेत. हा प्रकार अलिकडच्या काळात र.कृ. जोशी यांनीच सातत्याने हाताळला. त्या अंकाच्या मुखपृष्ठ व मलपृष्ठावर र.कृ. जोशी यांनी देवनागरी लिपीच्या अक्षरांच्या वळणांविषयी केलेल्या प्रयोगांचे काही अंशही दिग्दर्शित केले आहेत आणि अंकात पृ. ३ व ४ वर र.कृ. जोशींना आदरांजली वाहाणारे श्री. विनय सायनेकर यांचे एक वाक्य आहे.

## भाषावार्ता

मराठी साहित्य परिषद (आंध्रप्रदेश) संचालित मराठी महाविद्यालय यंदा सुवर्णमहोत्सव साजरा करीत आहे. त्यानिमित्ताने त्यांनी 'म-मराठीचा' (संपादक : उमा दादेगावकर) ही स्मरणिका प्रकाशित केली आहे. तसेच परिषदेचे मुखपत्र- 'पंचधारा' (संपादक : डॉ. उषा जोशी व इतर) हे त्रैमासिकही आपले सुवर्णमहोत्सवी वर्ष साजरे करीत आहे. महाराष्ट्रापासून दूर राहून मराठीची व्रतभावनेने सेवा करणाऱ्या परिषदेचे अध्यक्ष प्रा. द.पं. जोशी व त्यांचे सहकारी यांचे मन:पूर्वक अभिनंदन !

# मराठीचे लेखननियम : प्रास्ताविक

प्र.ना. परांजपे

'मराठी अभ्यास परिषदे'च्या प्रेरणेने, मॉडर्न महाविद्यालयाच्या (शिवाजीनगर, पुणे) पुढाकाराने आणि राज्य मराठी विकास संस्थेच्या आर्थिक पाठबळाने मराठी शुद्धलेखन-नियमांचा पुनर्विचार करण्यासाठी मार्च २००८मध्ये पुण्यात एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. 'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा २००८च्या अंकात प्रसिद्ध झालेला प्रा. (डॉ.) स्नेहलता तावरे यांचा निबंध चर्चासत्रातील चर्चेसाठी आधार-निबंध होता. चर्चासत्राच्या अखेरीस कोणतेही निर्णय घेण्यात आले नाहीत. हे मुद्दाम नमूद करण्याचे कारण असे की, 'लोकसत्ता'साठी चर्चासत्राचा वृत्तान्त लिहिताना अरुण फडके यांनी तसा आभास निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता. चर्चासत्रात सादर करण्यात आलेले काही निबंध या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.

या संदर्भात वापरण्यात येणारा 'शुद्धलेखन' हा शब्द सामाजिक संदर्भात गैरसमज निर्माण करणारा आणि लेखन-नियमांच्या भाषावैज्ञानिक स्वरूपावर अन्याय करणारा आहे. मराठी जाणणाऱ्या जास्तीत जास्त लोकांना जास्तीत जास्त काळापर्यंत मराठीतील मुद्रित मजकूर समजावा, हा लेखनविषयक नियमांचा मुख्य उद्देश असतो. म्हणून या नियमांना 'शुद्धलेखनाचे' किंवा 'प्रमाणलेखनाचे' नियम असे न म्हणता नुसते 'लेखनाचे नियम' म्हणावे असे वाटते.

मराठीच्या लेखन-नियमांची चर्चा गेली सुमारे दीडशे वर्षे होत आलेली आहे आणि त्याबद्दल अनेक पुस्तकेही प्रकाशित झालेली आहेत. पैकी १९५० नंतर प्रकाशित झालेली महत्त्वाची पुस्तके अशी : (१) ह.स. गोखले (दि पूना प्रेस ओनर्स असोसिएशन) : 'शुद्धलेखन, शुद्धमुद्रण शब्दकोश' १९६१. (२) मो.रा. वाळंबे : 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' १९८१. (३) द.न. गोखले : 'शुद्धलेखनविवेक' १९९३. (४) यास्मिन शेख : 'मराठी लेखन मार्गदर्शिका' १९९७. (५) अरुण फडके : 'मराठी लेखनकोश' २००१. मराठी साहित्य महामंडळाने १९६२ मध्ये तयार केलेले व १९७२ मध्ये वाढविलेले लेखन-नियम महाराष्ट्र राज्य शासनाने स्वीकारले आणि त्यामुळे सध्या बहुश: तेच नियम वापरात आहेत. त्या नियमांबाबत असमाधानी



अनुक्रमणिका

असणाऱ्यांनाही परस्वाधीन मुद्रणामध्ये तेच नियम स्वीकारावे लागतात.

लेखन-नियमांत कोणत्या गोष्टींचा समावेश होतो ? निदान व्हावा ?

(१) लिपी-बाराखडी (२) शब्दलेखन : शब्दांना होणाऱ्या विकारांचे लेखन (उदा० सामान्यरूप, अनेकवचन, विभक्ती प्रत्यय), जोडाक्षरलेखन, अनुस्वार व अनुस्वारांचे परसवर्ण लेखन, सामासिक व संधी केलेल्या शब्दांचे लेखन (३) विरामचिन्हे.

लेखन-नियम हे मुख्यत: प्रमाणभाषेच्या लेखनाचे नियम असतात आणि मराठीच्या बाबतीत ते मुख्यत: प्रमाणभाषेच्या उच्चारावर आधारलेले असतात. कुठलीही व्यक्ती १००% प्रमाणभाषा वापरते असे नाही; किंबहुना व्यक्तीच्या शब्दोच्चारात, वाक्योच्चारात व्यक्तिनिहाय भेद असतातच. पण असे भेद लेखन-नियमांचा आधार होऊ शकत नाहीत. [नाटके, कथा, कादंबऱ्या, कविता पूर्णत: किंवा अंशत: बोलीभाषेत लिहिली जाऊ शकतात आणि त्या वेळी त्या त्या बोलींच्या उच्चारानुसार त्यांचे लेखन केले जाते. काही वेळा काही लेखक आपल्या शैलीकडे वाचकांचे लक्ष वेधून घेण्यासाठी हेतुत: नियमभंग करतात.] मराठीच्या प्रमाणभाषेचे उच्चारण व सध्याच्या लेखन-नियमांनुसार केलेले लेखन यांत तफावत पडत आहे असे बऱ्याच जाणकारांना वाटू लागले आहे. त्याचप्रमाणे संस्कृतचे शिक्षणातील स्थान जवळजवळ नगण्य झाले असल्यामुळे संस्कृतामधून आलेल्या तत्सम शब्दांना अनुलक्षून करण्यात आलेले नियम अनेकांना अनावश्यक वाटू लागले आहेत.

लेखन-नियमांत लिपी हा प्रधान घटक आहे. या बाबतीत आवश्यक असलेले बदल मराठी साहित्य महामंडळाने व राज्य मराठी विकास संस्थेने २००१ मध्येच संमत करून शासनाकडे पाठवले आहेत. त्याबरोबरच त्यांनी जोडाक्षर-लेखन पद्धतीची 'पुनर्मांडणी' केली आहे. (ठालेपाटील २००८ : १४) शुद्धलेखन पुनर्विचाराचे काम येत्या दोन वर्षांत पूर्ण करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. (ठालेपाटील २००८ : १५) त्यांचा तो प्रयत्न यशस्वी होईल अशी आपण आशा करू. पुनर्विचारात ते विरामचिन्हांचाही समावेश करतील अशीही आपण आशा करू.

या चर्चेच्या निमित्ताने, लेखन नियमांनुसार केले नाही तर फारसे बिघडत नाही असा लोकानुरंजनवादी पवित्रा घेणारे काही लोक आहेत. अलीकडे तर लेखनाचे नियम शून्य असावेत असा 'युक्तिवाद' करणारेही महाभाग आहेत. या बाबतीत (असलाच तर) मराठीचा ईश्वर त्यांना क्षमा करो असे म्हणण्यापलीकडे आपण काय करू शकतो ?

**संदर्भ :** ठालेपाटील, कौतिकराव. २००८. 'अध्यक्षीय', 'अक्षरयात्रा : २००८'. अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, औरंगाबाद. ■

सी-1, सुरजबन सहनिवास, पुणे 411007. दूरभाष : 020 - 25694617, 9422509638

# मराठीचे शुद्धलेखन : पुनर्विचार

कृष्ण श्री. अर्जुनवाडकर

मराठी भाषेचे शुद्धलेखन आणि उच्चारण या विषयावर पुण्यात आयोजित करण्यात आलेल्या चर्चासत्राची भूमिका मांडणाऱ्या पत्रकात असा विचार मांडला आहे की 'कवी', 'गुरू' यांसारखे शब्द सर्वत्र समान अर्थात दीर्घ लिहावेत; मग ते सुटे किंवा समासांत अंत्य स्थानी असोत किंवा समासांत पूर्वपद असोत. मराठीत 'च' वर्गातल्या व्यंजनांचे उच्चार दोन दोन आहेत : संस्कृताप्रमाणे तालव्य (चिवडा), आणि दंत्यतालव्य (चुटका). यांपैकी दंत्यतालव्य उच्चार असेल तेव्हा संबद्ध अक्षराखाली नुक्ता (टिंब) द्यावा (ज़ोर, ज़माव).

शिक्षणाच्या सर्व स्तरांवर विद्या आणि संकेतव्यवस्था (यांत शुद्धलेखन अंतर्भूत) यांच्या बाबतीत अध्ययन आणि अध्यापन या दोन्ही प्रक्रियांचा दर्जा संबद्ध व्यक्तींचा बौद्धिक स्तर आणि तयारी यांवर अवलंबून असतो. ही वस्तुस्थिती केवळ भाषा-विषयालाच नव्हे तर सर्वच विषयांना उपपन्न होते. शिक्षणाची उत्तरोत्तर चढती मांडणी करिताना शिक्षणतज्ज्ञांना विचार करावा लागतो तो दोन अंगांचा : (१) विषयातले वास्तव; (२) संकेतांची तर्कशुद्धता. शुद्धलेखन हा विषय यांपैकी दुसऱ्या गटात मोडणारा आहे. लेखन हा उच्चारित भाषेला दृश्य रूप देण्याचा उपाय आहे. अमुक स्वराचे चिन्ह हे, व्यंजनाचे हे, जोडाक्षरे अशी लिहावी, असे संकेत (चिन्हयोजना) देवनागरीत शतकानुशतकांच्या परंपरेने रूढ झाले आहेत. शब्दांच्या उच्चारात व्यंजने असतील तेथे लेखनात व्यंजने लिहावीत, स्वर असतील तेथे स्वर लिहावेत, उच्चार दीर्घ असेल तेथे दीर्घ स्वर, उच्चार ऱ्हस्व असेल तेथे ऱ्हस्व स्वर, असा उच्चार-लेखनसंवाद आधाराला घेऊन सुमारे पन्नास वर्षांपूर्वी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनाचे नवे नियम तयार केले. दादोबांच्या काळी प्रचारात असलेल्या जुन्या लेखननियमांत अनेक जागीं अनुच्चारित अनुस्वार येत. ते या नव्या नियमावलीत गाळले आहेत. आज लिहिल्या जाणाऱ्या प्रमाणभूत निबंधात्मक ग्रंथांत आणि पाठ्यपुस्तकांत असलेले लेखन नव्या नियमावलीनुसार होते. त्याचीच शिकवण शिक्षणसंस्थांतून होत असते.

शुद्धलेखन-शिक्षणातला तपशील ठरतो तो विद्यार्थ्यांचे वय आणि ग्रहणशक्ती

यांच्या आधाराने ठरत नाही. म्हणजे विषयाचे स्वरूप ठरविणे शिक्षकाच्या हाती नाही. मान्य अभ्यासक्रमानुसार शिकविणे ही त्याची कार्यकक्षा. कोणत्या टप्प्याला कोणत्या विषयात किती शिकवायचे, हे ठरविण्याचे काम शिक्षणतज्ज्ञांचे असते. विषयाचे स्वरूप ठरविणे हे काम त्यांच्याही अधिकारकक्षेतले नव्हे. एकाच वयाचे दोन विद्यार्थी ग्रहणशक्तीत भिन्न स्तरांवर असू शकतात. निसर्गाच्या कक्षेतल्या अशा भेदांवर माणसाचा अधिकार चालत नाही. व्यक्तीनुसार क्षमता, आणि क्षमतेनुसार प्रगती या गोष्टी वास्तवाच्या कक्षेतल्या आहेत. शिक्षण ही गोष्ट उभी आहे ती उन्नती हे उद्दिष्ट आणि त्यासाठी संस्कार, या पायांवर. **शिकणाऱ्याच्या कुवतीनुसार विषयाच्या स्वरूपात फेरफार ही गोष्ट शिक्षणाच्या पायावरच घाव घालणारी आहे.** आपण लिहितो ते डावीकडून उजवीकडे. काही माणसे जन्मत:च डावरी असतात. त्यांच्यासाठी अक्षरांची आणि लिहिण्याची दिशा उजवीकडून डावीकडे अशी केली तर चालेल ? हे चालणार असेल तर त्यांच्यासाठी पुस्तकेही उलटी छापावी लागतील. आपण लिहितो ते वेगळे, आणि पुस्तकात छापले आहे ते वेगळे, अशी परिस्थिती शिकणाऱ्याच्या मनात गोंधळ माजविणारी आहे. पाठ्यपुस्तकांतही असेच छापायचे अशी कल्पना असेल तर विद्यार्थी शिक्षणाच्या टप्प्यातून पार झाल्यावर पाठ्यपुस्तकाहून अन्य, जाणत्या लोकांनी लिहिलेल्या असंख्य पुस्तकांत वेगळे छापलेले पाहून विद्यार्थ्यांच्या मनाची काय स्थिती होईल ? घरातसुद्धा शिकणाऱ्या मुलांचे लिहिणे वेगळे, शिकलेल्या पालकांचे वेगळे, हे कोणत्या तत्त्वावर समर्थनीय आहे ? सोयीसाठी चुकीची माहिती विद्यार्थ्यांना देणे हे कोणत्या शिक्षणशास्त्रात बसते ? असे करणे अन्य एखाद्या विषयात खपेल का ?

मराठी भाषा आणि शुद्धलेखन यांचा विचार हा संकेताधारित आहे. मुळात भाषा हाच एक संकेत आहे; भाषेची लिपी हाही एक उत्तरकालीन संकेत आहे. म्हणूनच तर भिन्न देशांत भिन्न भाषा आणि भिन्न लिप्या प्रचारात आल्या. या दोन गोष्टी इतक्या दृढमूल झाल्या आहेत, की त्या बदलणे माणसाच्या हातात नाही. मराठी भाषा रोमन लिपीत लिहावी असा एक मतप्रवाह अलीकडे मराठी समाजात उगवला आहे. त्याचा जो प्रचार चालतो, त्याचा मराठी समाजावर परिणाम शून्यप्राय आहे. उच्चारित भाषा दृश्य स्वरूपात म्हणजे लिपीत मांडणे हा टप्पा पुढचा. मराठीने देवनागरी लिपी संस्कृताकडून उचलली. ही लिपी शतकानुशतकांच्या प्रगतीतून आजच्या टप्प्याला पोचली आहे. संस्कृताच्या दृष्टीने ती परिपूर्ण आहे. या लिपीची मराठीपुरती मर्यादा ही की कालक्रमाने मराठीत नवा दंत्यतालव्य व्यंजनवर्ग उगवला; त्यासाठी जवळची, संस्कृतातल्या तालव्य व्यंजनवर्गाची, आहेत तीच चिन्हे प्रचारात आली. चार (=४) आणि चावा या दोन शब्दांत 'च' हे चिन्ह समान असले तरी त्याचे उच्चार भिन्न

आहेत. ज्याला मराठी अवगत आहे, त्याला या दोन शब्दांतले 'च' व्यंजनाचे भिन्न उच्चार सवयीने अवगत होतात. हिंदीत दंत्यतालव्य व्यंजनांखाली एक टिंब (नुक्ता) देतात. अशी पद्धत मराठीत रुळली नाही. याचा अर्थ असा की लिखित चिन्हांच्या उच्चाराला आधार भाषाज्ञानाचा असतो.

प्रमाणभाषा आणि बोली असे भाषेचे दोन प्रवाह असतात. ज्या कुटुंबांत प्रमाणभाषा बोलली जाते, त्या कुटुंबांतल्या मुलांना लिहिण्यातली मूलतत्त्वे समजल्यावर लिहिणे फारसे अवघड जात नाही. बोली भाषेच्या प्रदेशातून किंवा कुटुंबातून आलेल्या मुलांना शिक्षणाचे सर्वसामान्य माध्यम असलेली प्रमाणभाषा लिहिणे जड जाते. याचे कारण उघड आहे. भाषा त्यांच्या बोलण्यात एक, तर लिहिण्यात वेगळी, अशी परिस्थिती असते. याला उपाय काय ? प्रमाणभाषेचा सराव हाच उपाय. इंग्रजी ज्यांची मातृभाषा नाही ती मुले इंग्रजी शिकू लागल्यावर याहून वेगळे काही होते काय ? इंग्रजी भाषेची रोमन लिपी आणि इंग्रजी लेखनात शब्दांची अक्षरजुळणी (स्पेलिंग) तर इतकी स्वैर आहे, की मराठीच्या लेखनाच्या जवळपासही ती फिरकू शकणार नाही. इंग्रजी शिकू लागलेल्या मुलांना या गोष्टी निमूटपणे मान्य कराव्या लागतात, आणि त्यांची सवय लावून घ्यावी लागते. त्या मानाने मराठी लेखन शिकताना येणाऱ्या अडचणी नगण्य आहेत. अमेरिकेत गेलेल्या इंग्रजी-भाषकांनी काही प्रमाणात इंग्रजी शब्दांची अक्षरजुळणी बदलली, हे खरे; पण एकूण भाषेच्या प्रमाणात हा बदल फार लहान आहे. असा वास्तवनिष्ठ बदल मराठीच्या लेखनात सुमारे पन्नास वर्षांपूर्वी साहित्यसंस्थांनी केला. मुख्य बदल म्हणजे दादोबांच्या काळात लेखनात प्रचारात होते, असे कित्येत अनुस्वार गाळण्यात आले, आणि ऱ्हस्व-दीर्घ लेखन उच्चारानुरूप केले. अनुच्चारित अनुस्वार टिकला तो अनेकवचनी सामान्य रूपाच्या अंतावरचा. (झाडावर, झाडांवर.) काहींच्या बोलण्यात तर या अनेकवचनी अनुस्वाराचे न्-मध्ये रूपांतर होते (झाडान्वर). जुन्याचा आणखी एक अवशेष म्हणजे बोलण्यात दीर्घ अकारान्त असलेली रूपे एकारान्त लिहिण्याची पद्धत. (घरे, झाडे, मुले...) अशी रूपे वास्तवानुकारी साहित्यात (नाटके, संवाद,...) अनुस्वारान्त लिहिण्याची (घरं, झाडं, मुलं...) परवानगी देण्यात आली. निबंधात्मक साहित्यात ती जुन्या रूढीप्रमाणे एकारान्तच ठेवण्यात आली (घरे, झाडे, मुले...). त्यामुळे ही रूपे बोलण्यात वेगळी, लिहिण्यात वेगळी; लिहिण्यातही कथा-नाटकांत वेगळी, निबंधांत वेगळी, अशी परिस्थिती आहे. ही विसंगती दूर करण्याचा मार्ग मी माझ्या 'मराठी व्याकरणाचा इतिहास' (१९९२) या ग्रंथात अवलंबिला आहे : उच्चारणात दीर्घ अकारान्त असलेली रूपे कथा-नाटकांत लिहितात तशी अनुस्वारचिन्हाने दाखविली आहेत (घरं, झाडं,

मुलं...). यातही मला जाणवणारी अडचण ही की एकच चिन्ह दोन उच्चारांसाठी, हे तर्कसंगत नाही. त्यानंतरच्या माझ्या 'गीतार्थदर्शन' (१९९५) या ग्रंथात मी ही विसंगती दूर करण्यासाठी दीर्घ अकारान्त शब्दांतले अंत्य अनुस्वारचिन्ह **पोकळ** केले (घरँ, झाडँ, मुलँ...) या बदलामुळे मराठीत 'सत्यं शिवं सुन्दरं' यासारख्या लेखनात अंत्याक्षराचा उच्चार कसा करावयाचा, हा प्रश्न उरला नाही. माझ्या समजुतीने एवढ्या बदलांनी प्रचलित मराठी लेखनाच्या नियमांतली विसंगती पुष्कळशी दूर होते.

'पुष्कळशी' असे म्हणण्याचे कारण काय ? 'करवत कापू लागली' अशा लेखनात पहिल्या शब्दातला र आणि व यांच्या उच्चारांची तुलना करून पाहा. या दोन अक्षरांतल्या 'अ' या स्वराचे उच्चार सारखे नाहीत. यांपैकी र-मधला 'अ' निभृत (गुप्त) म्हटला जातो; व-मधला 'अ' दीर्घ. वस्तुत: 'करवत' आणि 'पर्वत' या शब्दांच्या मधल्या अक्षरांच्या उच्चारात काय फरक आहे ? उच्चारानुसार लेखन, अशी टोकाची भूमिका घेतली तर लेखन किती बदलेल, याची कल्पना येण्यासाठी हे उदाहरण दिले आहे. या दोन्ही शब्दांतल्या अंत्य अक्षरांतलाही 'अ'कार निभृत आहे. 'अकस्मात्' या शब्दातले अंत्याक्षर आणि वरील दोन शब्दांतली अंत्याक्षरं यांमध्ये लक्षणीय फरक नाही. ही आपत्ती टाळण्यासाठी नियम बांधणाऱ्यांनी आदेश दिला की अंत्याक्षराचा पाय मोडू नये, 'अकस्मात' असे लिहावे. या उदाहरणांवरून ध्यानात येईल की **शंभर टके तर्कशुद्ध असे लेखननियम करणे मराठीत शक्य कोटीतले नाही.**

या भूमिकेवरून मराठी 'भाषेचे शुद्धलेखन आणि उच्चारण' या पत्रकातले प्रस्ताव पाहिले तर असे लक्षात येते की त्यांत केवळ विद्यार्थ्यांच्या सोयीचा विचार केला आहे, विद्येतल्या सुसंगतीचा विचार नाही. पण प्रश्न केवळ सोयीचा नाही; मराठी शब्दांचे प्रमाणित उच्चार आत्मसात करण्याचाही आहे. गुरूभक्ती, बुद्धीवैभव असे लिहिण्याचे शिक्षण मिळाले तर आजवरच्या प्रमाणभूत ग्रंथांच्या लेखनात आणि प्रमाण उच्चारांतही गुरुभक्ती, बुद्धिवैभव अशी रूपे येतात ती चुकीची ठरू लागतील. लेखनानुसार उच्चारण होऊ लागेल, आणि मराठी भाषेत अराजक माजेल. मातृभक्ती या शब्दातला मातृ हा पूर्वावयव स्वतंत्र येतो तेव्हा माता असे त्याचे रूप असते. गोंधळ होतो म्हणून सगळीकडे माता (माताभक्ती) हेच रूप लिहिण्याचे ठरविले तर प्रमाण उच्चारांत गोंधळ होईल त्याचे काय ? शेवटी उच्चारणातली भाषा हे भाषेचे आधारभूत, मूलभूत स्वरूप आहे; लेखन म्हणजे त्याला दृश्य रूप देण्याचा उपाय आहे, ही वस्तुस्थिती आहे. **सोयीचे म्हणून प्रमाण-उच्चारणभिन्न लेखन प्रचारात आले तर उच्चार आणि लेखन यांचा आधाराधेय (आश्रय-आश्रित) संबंध धोक्यात येईल.** लेखन हे उच्चारगत भाषेचे छायाचित्र आहे, फोटो आहे. प्रत्यक्षात माणसाच्या मिशा लांब असतील आणि

फोटोग्राफर त्या आखूड करू म्हणेल, तर ओळखपत्राला (आयडेंटिटि कार्ड) असा फोटो चालणार नाही.

खोलात जाऊन विचार केला तर नियमानुसार लेखन हा कमी श्रमाचा आणि अधिक सोयीचा मार्ग आहे हे लक्षात येईल. तिकीट काढण्यासाठी रांग लावण्याने गोंधळ वाढत नाही; कमी होतो. कोणत्याही सामान्य व्यवस्थेचे नियम ही प्रगत संस्कृतीची निशाणी आहे; मुळात जाऊन विचार केला तर ती कमीत कमी श्रमांत अधिकांत अधिक लोकांची सोय आहे. भाषांचा इतिहास पाहिला तर त्यांतही दीर्घ काळाने परिवर्तने झालेली आढळतात. ती भाषेत रुळलेली असली की मान्य होण्यात अडचण नाही. संस्कृत 'गर्दभ' शब्दावरून मराठी गाढव शब्द आला आहे, 'मनुष्य' शब्दावरून माणूस शब्द आला आहे. या परिवर्तनातले मधले टप्पे प्राकृत भाषांत आढळतात. पण लोकभाषेत शिक्षण, ग्रंथरचना अशा कार्यांना स्थिरता येणे ही पूर्वी न जाणवलेली आजची गरज आहे. सोयीप्रमाणे लेखनाचे नियम बदलल्याने ही कार्ये धोक्यात येतील. भाषा आणि लेखन हा मानवी संस्कृतीचा अविभाज्य भाग आहे. जुन्या काळात जसे पाणिनीय संस्कृत होते, तशी आजच्या काळात प्रमाण मराठी बंधनकारक आहे.

विषयभूत पत्रकात अन्य बऱ्याच 'मराठी भाषेतल्या गमतीजमती' दिल्या आहेत; 'उच्चारानुसार लेखन' अशी भूमिका घेतली तर 'मराठीतील काही अक्षरे पूर्ण नष्ट होतील' असा धोका दाखविला आहे. या विधानात **उच्चार म्हणजे प्रमाण-उच्चार हे शुद्धलेखनाचे गृहीत** दुर्लक्षित झाले आहे. पदार्थविज्ञान, गणित, इतिहास, भूगोल, अन्य भाषा (हिंदी, इंग्रजी...) इत्यादी अनेक विषय शिक्षणात येतात. यांपैकी कोणता विषय सोयीसाठी स्वरूपात परिवर्तन चालवून घेईल ? विद्यार्थ्यांच्या कुवतीनुसार याही विषयांत काही तपशील सोपे, तर काही अवघड असतात. या विषयांतल्या पारिभाषिक शब्दांचे उच्चारण आणि लेखन यांत विद्यार्थ्यांच्या स्तरावर फरक पडत असल्यास विद्यार्थ्यांची सोय पाहणार काय ? शेवटी शिक्षण म्हणजे काय, त्याचे उद्दिष्ट काय, हे दृष्टीआड होऊ न देता शिक्षणाचे टप्पे ठरविले जातात. विषयाच्या स्वरूपात ढवळाढवळ करण्याचा अधिकार शिक्षणशास्त्राला नाही. प्रमाणभाषेत ऱ्हस्व-दीर्घ भेद असताना सोयीसाठी तो लेखनातून हद्दपार करणे कोणत्या शिक्षणशास्त्रात बसते ? रस्त्यावरच्या वाहतुकीचे नियम धाब्यावर बसविले तर काय होईल ? वाहने प्रमाणाबाहेर वाढल्यामुळे आज पुण्यातल्या बऱ्याच रस्त्यांवर वाहतुकीचे नियम धाब्यावर बसविले जातात. त्यामुळे रस्त्यांची दुरवस्था झाली आहे. तशी पाठ्यपुस्तकांची झाली तर ? वस्तुत: तशी ती काही प्रमाणात झालीच आहे, हे बारावीचे संस्कृताचे पुस्तक पाहिल्यावर माझ्या लक्षात आले. विवेक सुटला तर या परिस्थितीतून मानवाला वाचविण्याचे सामर्थ्य एका

परमेश्वरालाच आहे ! शेवटी भाषेचे आधारभूत स्वरूप कोणते, उच्चारित की लिखित, याविषयीची भूमिका निश्चित माहीत होणे आवश्यक आहे. ती माहीत झाल्यावर लेखनात स्वैरपणे फरक करण्याची प्रवृत्ती होणार नाही.

भाषा-लेखनसंबंध भारतातल्या बहुतेक भाषांत (किमान मराठीत) आहे तितका जवळचा इंग्रजीत नाही, हे लक्षात घेतल्यावर तर लेखन बदलण्याची चळवळ इंग्रजी भाषेच्या मुलखात होणे हे अधिक तर्कशुद्ध ठरेल. इंग्रजीची वर्तमान लिपी रोमनः तीत देवनागरीची शिस्त अणुमात्र नाही. इंग्रज हा शिक्षणात भारतापेक्षा किती तरी पुढारलेला, तितकाच सुधारणेला अनुकूल. असे असूनही इंग्रजी शब्दांची स्पेलिंगे बदलण्याचा विचार त्याच्या मनात येत नाही, तो का ? कारण त्याला हे माहीत आहे की असे करणे व्यवहार्य नाही. जॉर्ज बर्नार्ड शॉ या नामवंत लेखकाच्या मते bomb हा शब्द उच्चारानुसार bom असा लिहिणे योग्य ठरते. (पाहा : 'ईट्स शूट्स अँड लीव्हज्' - लिन ट्रस पृ. १८५-८६) त्याच्या या मताकडे इंग्रज समाजाने लक्ष दिले नाही, ते का ? कोणाही सुधारणावादी माणसाला भाषेत अस्तित्वात असलेल्या प्रचंड ग्रंथसंपदेचे लेखन बदलणे सुतराम् अशक्य आहे. ते शक्य आहे असे मानले तरी त्यासाठी करावे लागणारे श्रम आणि त्याने होणारा लाभ यांचा काही मेळ बसेल का ? कायद्यात बदल केले जातात ते तपशिलात, मूळ आधारतत्त्वांत नाही. लेखन हा भाषाभिवृद्धीचा कायदा आहे. प्रमाण-उच्चार हे लेखनाचे आधारतत्त्व आहे. ते लेखनात कसे सोडता येईल ? सोय ही दुय्यम गोष्ट आहे. 'उदा.' म्हणजे उदाहरणार्थ, ही लेखनातली सोय आहे. पत्राच्या शेवटी क.लो.अ.ही वि. (कळावे, लोभ असावा, ही विनंती) असा संक्षेप करणारे अजूनही बरेच मराठीभाषी आढळतील. उच्चारणातही क्वचित असे संक्षेप येतात; उदा० नावाची आद्याक्षरे (जसे : ग.त्र्यं. माडखोलकर, पु.ल. देशपांडे...), पदव्या (बी.ए.,एम.ए. ...) काही संक्षेप केवळ लिहिण्यापुरते मर्यादित आहेत; उच्चारणात पूर्ण शब्द येतात. उदा० डॉ(क्टर). अशा सोयी शुद्धलेखनाच्या नियमांत ढवळाढवळ करीत नाहीत. त्यांच्यावर कोणी आक्षेप घेणार नाही. प्रस्तुत चर्चेला विषयभूत असलेल्या पत्रकातल्या सोयी मुळावरच घाव घालणाऱ्या आहेत.

■

2, देवांगिनी, 1192, शुक्रवार पेठ, पुणे 411002.
दूरभाष : 24479419



अनुक्रमणिका








# प्रचलित शासनमान्य लेखन-नियमावली : काही मतभेद

सत्त्वशीला सामंत

**नियम ४ :**

[१] अनुस्वार हे फक्त उच्चारदर्शकच असतात हा गैरसमज आहे. स्पष्टोच्चाराव्यतिरिक्त, कधी कधी लिंगवचनादी व्याकरणिक घटक सूचित करणे हे देखील अस्पष्टोच्चारित अनुस्वारांचे प्रयोजन असू शकते.

उदा० ***नाती*** सांभाळणे मला अधिक महत्त्वाचे वाटते. (नाती = ग्रँडडॉटर्ज)

***नातीं*** सांभाळणे मला अधिक महत्त्वाचे वाटते. (नातीं = रिलेशनशिप्स)

[२] व्युत्पत्तिसिद्ध अनुस्वार दिल्यामुळे भाषेचा इतिहास जपला जातो व अनेकदा असे अनुस्वार अर्थभेदासाठी उपकारक ठरतात.

उदा० गुंतता हृदय हे कमलदलाच्या ***पाशी*** (जवळपास)

अथवा

गुंतता हृदय हे कमलदलाच्या ***पाशीं*** (पाशांत)

**नियम ९ :** मराठीतील तत्सम ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त नामे एकवचनात ऱ्हस्वान्त व अनेकवचनात दीर्घान्त लिहावीत. यादवकालीन मराठीत हा भेद होता. (संदर्भ : कै. वि.का. राजवाडे-कृत व कै. शं.गो. तुळपुळे-संपादित 'ज्ञानेश्वरीची प्रस्तावना' आणि 'ज्ञानेश्वरीतील मराठीचे व्याकरण' ह्या ग्रंथात अशा रूपांचे उल्लेख दिलेले आहेत.)

तसेच, कै. मो.के. दामले ह्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथात पृ. २९५वर अशा एका वादचर्चेचा उल्लेख आहे. 'प्राकृत मत' (तत्सम ऱ्हस्वान्त नामे दोन्ही वचनांत दीर्घान्त), 'संस्कृत मत' (तत्सम ऱ्हस्वान्त नामे दोन्ही वचनांत दीर्घान्त), व 'तडजोडीचे मत' (ए. क. ऱ्हस्वान्त : अ.व. - दीर्घान्त) अशा तीन मतमतांतरांचा निर्देश केलेला आहे. कै. दामले यांच्याप्रमाणेच मलाही 'तडजोडीचे मत' ग्राह्य वाटते.

तत्सम ऱ्हस्वान्त विशेषणे कशी लिहावीत याबद्दल सरकारी नियमांत कुठेही स्पष्ट उल्लेख नाही. माझ्या मते तत्सम ऱ्हस्वान्त विशेषणे यथामूल ऱ्हस्वान्त लिहावीत. म्हणजे

त्यावरून भाववाचक नामे आपोआप सिद्ध होतील.

उदा० गुरु → गुरुत्व, अति → अतित्व, पटु → पटुता, लघु → लघुत्व

सरकारी नियमांनुसार, व्यक्तिनामे, ग्रंथनामे, शीर्षके व सुटे तत्सम ऱ्हस्वान्त शब्द मराठीत दीर्घान्त लिहावेत असे ठरवले गेले आहे. तथापि, कोणत्याही विशेष-नामात बदल करण्याचा आपल्याला हक्क नाही. म्हणून व्यक्तिनामे, ग्रंथनामे, शीर्षके व सुटे तत्सम शब्द मुळाबरहुकूम ऱ्हस्वात वा दीर्घान्त लिहावेत असे माझे मत आहे.

इन्नन्त शब्दांच्या बाबतीत संस्कृत भाषेचा नियम लावू नये असे मला वाटते. कारण संस्कृतमधील 'इन्नन्त' शब्द मराठीत अवतरताना बहुशः त्यांच्या प्रथमा एकवचनी रूपात अवतीर्ण झाले आहेत. जुन्या व नव्या वा आधुनिक अशा कोणत्याही शब्दकोशात ते दीर्घान्तच दाखवले जातात. उदा० :

| | | |
|---|---|---|
| **संस्कृत** : | पक्षिन् | प्राणिन् |
| **मराठी** : | पक्षी | प्राणी |

त्यांचे मराठीतील हे दीर्घान्त मूळ रूप गृहीत धरून, त्या आधारे समाससिद्धी करणे सुकर होते.

उदा० : पक्षी → पक्षीवर्ग, पक्षीतीर्थ, प्राणी → प्राणीसंग्रहालय

**अपवाद :** परंपरागत 'शशिकांत' व 'शशिकला' ही विशेषनामे असल्याने त्यांच्या बाबतीत विकल्प असावा. 'शशिकांत' व 'शशीकांत' आणि 'शशिकला' व 'शशीकला' ही दोन्ही रूपे ग्राह्य मानावीत.

**नियम १४ :** संस्कृतमधील हलन्त शब्द यथामूल लिहावेत.

**नियम १५ :** विद्यमान सरकारी नियमानुसार, केशवसुतांसकट पुढील कवींचे काव्य व विष्णुशास्त्री चिपळूणकरांसकट पुढिलांचे गद्य सरकारी नियमांनुसार उद्धृत करणे अपेक्षित आहे. मराठी कवितेत ऱ्हस्व-दीर्घाची मोडतोड करणे सर्वसंमत आहे. प्रश्न येतो तो अस्पष्टोच्चारित अनुस्वारांचा. अव्वल इंग्रजी अमदानीतील केशवसुतादी कवी आणि १९६२ सालचे नवे नियम आल्यानंतरही ज्यांनी आपल्या कवितेतून अस्पष्टोच्चारित पण व्याकरणशुद्ध अनुस्वारांना फाटा दिला नाही असे कवी (ना.घ. देशपांडे, बा.भ. बोरकर, इंदिरा संत, पु.शि. रेगे, आरती प्रभु व ग.दि. माडगूळकर) यांनी कायदेभंग केला असे म्हणता येईल काय ? त्यांच्या कवितांतील सार्थ अनुस्वार गाळण्याचा आपणांस अधिकार नाही. शिवाय, त्यांच्या कवितांतील सार्थ अनुस्वार गाळल्यामुळे अर्थाचा अनर्थ होत असल्यामुळेही तसे करणे इष्ट ठरणार नाही. कोणत्याही लेखकाचे गद्य वा पद्य साहित्य हे यथामूलच उद्धृत करावयास हवे म्हणून नियम १५ बदलावा. ■

16, यशोदाकुंज, सी.टी.एस. 332, तेजस् नगर, कोथरूड, पुणे 411038. दूरभाष : 25383755





अनुक्रमणिका

# तत्समांना देश्य वागणूक

विश्वास वसेकर

- १ -

भाषिक व्यवहारात इंग्रजी आणि संस्कृतची एवढी गडद छाया आमच्यावर आहे की शुद्धलेखनाच्या संदर्भात तत्सम शब्दांना मराठीचे नियम लावण्याची आपली हिंमत होणं तर सोडाच, आपले नियम गुंडाळून त्यांच्यासाठी वेगळे नियम करण्याची आपली तयारी आहे. सहज हिंदीचं उदाहरण मी देतो. त्यांनी इंग्रजीतले 'ॲ' आणि 'ऑ' हे स्वरोच्चार नाही म्हणजे नाहीच स्वीकारले. उलट त्यांना हिंदी पेहराव दिला. ॲरिस्टॉटलचे अरस्तू, सॉक्रिटीसचे सुकरात, ट्रॅजेडीचे त्रासदी, ऑक्टोबरचे अक्तूबरच केले. मग आपणच इंग्रजी आणि संस्कृतच्या वेळी एवढे अगतिक का होतो ?

ऱ्हस्वदीर्घतेपासून आपण सुरुवात करू. तत्सम शब्दातले ऱ्हस्व इकारान्त व ऱ्हस्व उकारान्त शब्द मराठीत आज दीर्घान्त लिहिले जातात. पण तेच शब्द समासात प्रथमपदी आले असता त्यांचे ऱ्हस्व रूप कायम ठेवण्याचा आग्रह आपले व्याकरणकार धरतात. प्रा. डॉ. स्नेहल तावरे यांनी सामासिक शब्दातल्या प्रथमपदाला दीर्घान्त ठेवण्याची केलेली सूचना मला स्वागतार्ह वाटते.

तत्सम व्यंजनान्त शब्दांच्या बाबतीत आपण बऱ्याच अंशी मराठीपण आणलं आहे. विद्वान्, श्रीमान्, क्वचित्, भगवान् हे व्यंजनान्त शब्द आपण स्वरान्त लिहितो हे ठीकच आहे. आता उरलेल्या कदाचित्, अर्थात् या बिचाऱ्यांचे लंगडेपण मराठीच्या वात्सल्यातून घालवायला काय हरकत आहे ?

सामासिक शब्द अव्यय असेल तर उत्तर-पदात येणारे ऱ्हस्व इकारान्त वा उकारान्त तत्सम शब्द ऱ्हस्वच लिहावेत या नियमाचाही पुनर्विचार करावयाची वेळ आली आहे. कारण इथंही व्युत्पत्तीसाठी संस्कृतज्ञान अनिवार्य ठरतं. यथामति, अद्यापि, तथापि, यद्यपि हे दीर्घान्त लिहिण्यानं कोणता अनर्थ होणार आहे ?

प्रा. प्र.ना. दीक्षित यांनी आपल्या 'मराठी व्याकरण : काही समस्या' या ग्रंथात ऱ्हस्वदीर्घवादाचा फार सुंदर समारोप केला आहे - ''तत्सम शब्दांमुळे मराठीला नियम



अनुक्रमणिका

करणे अशक्य होऊन बसले आहे. 'विक्रोळी' हा शब्द 'वीक्रोळी' असा लिहिला तरी पत्र विक्रोळीलाच जाते असा अनुभव येत गेल्यामुळे सामान्य माणूस शुद्धलेखनात फार रस घेत नाही. कोर्टकचेरीत शुद्धलेखनाचा संबंध कायदेशीरपणाशी जोडलेला नाही. त्यामुळे सर्वसमावेशक संस्कृतीनुसार आपल्या भाषेलाही ऱ्हस्वदीर्घाच्या खोड्यातून मुक्त करावे लागेल असे वाटते. तत्सम शब्द जर जास्त वहिवाटले तर त्यांचेही उच्चारण मराठीच्याच वळणावर जाते. म्हणून **जेथे अर्थाचा अनर्थ होणार नसेल तेथे ऱ्हस्वदीर्घ या विचारांचा फार काटेकोर नियम यापुढे ठेवता येणार नाही.** 'शीला', 'शिला' आणि 'सुशीला' हे तीन शब्द अर्थदृष्ट्या भिन्न आहेत. मंत्र्यांनी शिलान्यास केला हे लिहिण्याऐवजी शील-न्यास (त्याग ?) केला असे लिहिले तर अनर्थ होईल. सुत (पुत्र) व सूत (दोरा) हे दोन भिन्न शब्द आहेत. अशा शब्दांचे लेखन मात्र कटाक्षाने जमले पाहिजे. बाकीची बंधने शिथिल करणे योग्य ठरेल.''

अनुस्वारांच्या बाबतीत मात्र आपण संस्कृतच्या कर्मकांडातून बरेच आणि बरेच लवकर बाहेर पडलो आहोत. स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दलच आता शीर्षबिंदू द्यावयाचा आहे. नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवर अनुस्वार दिला नाही तर ते अनेकवचन आहे हे कळणारच नाही म्हणून तो अनुस्वारही आवश्यक आहे.

- २ -

नवीन अकरावी बारावीच्या व्याकरणात वीस ऐवजी दहा गुणांचं व्याकरण करण्यात आलेलं असलं तरी शुद्धलेखनाच्या गुणांत माझ्या मते दुप्पट वाढ झाली आहे. कारण यावर्षी पारिभाषिक शब्द हा प्रश्न नव्यानं वाढविण्यात आला असून त्यालाही शुद्धलेखनाएवढेच गुण ठेवण्यात आले आहेत. यामुळे चांगले पर्यायी मराठी शब्द उपलब्ध असताना  अकारण इंग्रजी शब्द वापरण्याच्या प्रवृत्तीला आळा बसावा अशी अपेक्षा आहे. पारिभाषिक शब्दांचा विचार मला नुसत्या लेखनाच्याच नाही तर भाषिक शुद्धीच्या संदर्भात प्रस्तुत वाटतो.

शास्त्रे आपण बाहेरून आणल्याने परिभाषेचा प्रश्न बिकट झाला आहे. भारतीय भाषा साहित्यात जशा समृद्ध आहेत तशा परिभाषेत नाहीत. प्रत्येक शास्त्राची पुन्हा वेगळी परिभाषा असते. रॅशनलायझेशन हा एकच शब्द; त्याचे साहित्यात, तत्त्वज्ञानात, अर्थशास्त्रात आणि यांत्रिकीत भिन्न अर्थ होतात. शास्त्रांचा स्वीकार अपरिहार्य असल्याने भाषिक पर्यावरणात नवे प्रश्न उपस्थित होतात. इंग्रजी शब्दांचे भाषांतर करताना, किंवा ते शब्द जसेच्या तसे स्वीकारताना त्यांचे सामान्यरूप करताना, प्रत्यय लावताना आणि अनेकवचनं करतानाही मराठीच्या पद्धतीनं त्यांची अनेकवचनं करता येतील ? आमच्या

परभणी जिल्ह्यात ती बिनधास्तपणे कशी केली जातात याचं उदाहरण इतिहाससंशोधक डॉ. ब्रह्मानंद देशपांडे भाषणातून सगळीकडे सांगत असतात. महिला आपसात पाहुणाचाराबद्दल टिकाटिप्पणी करताना म्हणतात : आम्हाला काय माय, चहाचं फुळूकपाणी दिलं, त्यांना मात्र थम्सपं, लिमके, कोकोकोले.

मराठीत इंग्रजीतून आलेले काही वाक्प्रयोग सुंदर रुळले आहेत. उदा० लोकशाही, भाषणस्वातंत्र्य, परीक्षेस बसणे, एम.ए.करणे. अडचणी सामासिक शब्दात संधी करताना येतात आणि अशा शब्दातील पदं भिन्न भाषेतली असली तर संधी करताना संस्कृत-मराठीचे नियम त्यांना लावावेत काय ? प्रा. भा.शं. भणगे यांनी बँकिंग + अरिष्ट, विद्युत + इंजिन, आयुर्विमा हे शब्द देऊन म्हटले आहे की 'संस्कृत शास्त्रोक्त पद्धतीने हा विवाह लावल्याचे दिसते. ह्या हिंदू-फारशी विवाहाबद्दल महाराष्ट्रातील एका विद्वानाने शंका विचारल्याबद्दल एका टीकाकाराला 'अक्कलशून्या'ची आठवण झाली. टीकाकाराच्या या ज्ञानाबद्दल पहिल्या विद्वानाला आश्चर्य करण्याचे कारण नाही. त्याला 'बँडबाजा'ची आठवण होईल. 'अक्कलशून्य' आणि 'बँडबाजा' या शब्दांत रूप बदलण्याचा प्रश्न आला नाही. आयुस् + विमा ह्या शब्दात तसा प्रश्न आला. संधीचे नियम उच्चारसौकर्यावर आधारलेले असल्यामुळे 'आयुर्विमा' हा शब्द चालण्यास हरकत नाही असे सांगून प्रा. भणगे यांनी १९६२ साली दिल्लीला झालेल्या एका परिसंवादाचा हवाला देत भाषातज्ज्ञांनी सामासिक शब्दात संधी टाळावा हे मत स्वीकारल्याचे सांगितले आहे. संधी टाळण्याचा हेतू असा की, शब्दातील पदे स्पष्ट दिसून शब्द कळणे सोपे जाईल. नव्या मराठी शुद्धलेखनाप्रमाणे व्यंजनान्त शब्दातील व्यंजन पाय मोडून लिहिले नाही तर हा प्रश्न आणखी सोपा होतो. उदा० मृद् + झीज (soil erosion) हा संधी मृज्झीज होईल.

प्रत्येक वेळी पारिभाषिक शब्द तयार करणं इतकं सोपं आणि सहज असेलच असं नाही. पुष्कळांना देश्य शब्द ग्राम्यतेकडे झुकणारे म्हणून वर्ज्य वाटतात आणि मग संस्कृतचा आधार बरा वाटतो. लाउडस्पिकरसाठी विदर्भात 'बोंबल्या' हा शब्द रूढ होता. प्रमाणमराठीनं मात्र 'दूरध्वनिक्षेपक' करून घेतला आहे. हे होणंही साहजिक आहे. तरीपण जोपर्यंत मराठीत तोलामोलाचा शब्द सापडतो तोपर्यंत संस्कृतचे साहाय्य न घेतलेलेच बरे. मराठीची जननी संस्कृत असल्यानं आम्हांला ती वर्ज्य असण्याचं कारण नाही. पण तारतम्य हवे. मराठीपण जपायला आणि जोपासायला हवे. आमचा आक्षेप संस्कृतला नाही तर संस्कृत व्युत्पत्तिशोधनाला आहे. या मुद्याचा समारोप रा.भि. जोशी यांच्या १९२३ साली प्रकाशित झालेल्या 'मराठी भाषेची घटना' यातील एका अवतरणाने करता येईल. ''संस्कृत भाषा नवीन शब्द बनविण्यास अथवा जुने शब्द

नवीन अर्थयोजना करून घेण्यास जरी उपयोगी आहे, तरी तींत शब्दव्युत्पतीचा विचार करण्याची तऱ्हा फाजील विवेचनाने फार वाढल्यामुळे तिचे अनुकरण करणे आपल्यास अडचणीचेही आहे. शब्द म्हटला की तो एखाद्या मूळ धातूपासूनच बनला, हा संस्कृतातला सिद्धान्त योग्य नाही. काही शब्द अगदी प्रथमारंभी नामे म्हणूनच अथवा अव्यये, सर्वनामे म्हणूनच उत्पन्न झाले नाहीत कशावरून ? प्रत्येक शब्दात अमुकच धातू असावा अशी कल्पना बांधीत बसण्यात फायदा कोणता ? संस्कृतामधली ही व्युत्पत्तिशोधनाची पद्धत स्वीकारून मराठी शब्दांच्या विचारात घोटाळा करण्याची गरज नाही.''

■

नूतन महाविद्यालय, सेलू (जि. परभणी)

## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार : २००८

### निवेदन

मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनाला पुरस्कार देण्याची योजना मराठी अभ्यास परिषद महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने १९८३ पासून राबवीत आहे. इ.स. २००८ च्या प्रस्तुत पारितोषिकासाठी २००६ व २००७ या दोन वर्षांतील प्रकाशित किंवा हस्तलिखित स्वरूपाचे भाषेसंबंधीचे मराठीत लिहिलेले वैचारिक लेखन विचारात घेतले जाईल. (कथा, कादंबरी, कविता इत्यादी स्वरूपाचे ललित लेखन विचारात घेतले जाणार नाही.) पारितोषिकाची रक्कम रु. ५,०००/- असून लेखक अथवा प्रकाशक यांनी दि.३१ ऑगस्ट २००८ पर्यंत लेखन पाठवावे, अशी विनंती आहे. या विषयाबद्दल आस्था असणाऱ्यांनी आपल्या वाचनात आलेल्या लेखनाची शिफारस पाठवायला हरकत नाही.

**पत्रव्यवहारासाठी पत्ता :**
डॉ. नीलिमा गुंडी, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे ४११००२. दूरभाष : २४४८६०१५

# बदलानुसार नियम की नियमानुसार बदल ?

राधा नेरकर

शुद्धलेखनाचे नियम ठरवण्यासाठी उच्चारणपद्धती हा पाया किंवा आधार म्हणून स्वीकारणं हे जरा गुंतागुंतीचंच होणार आहे. महाराष्ट्रासारख्या मोठ्या भूप्रदेशात शब्द व शब्दोच्चार ठायी ठायी बदलतात. ग्रामीण उच्चार/आघात व शहरी उच्चार यातलं अंतर व फरक हा तर नेहमीच चर्चेचा विषय ठरत आला आहे. त्यामुळे कोणते उच्चार प्रमाण म्हणून धरायचे ? जर शहरी व उच्चभ्रू उच्चार प्रमाण मानायचे असतील तर हा सगळा घोळ घालण्यापेक्षा आहेत तेच नियम कायम ठेवावेत की.

ग्रामीण भागात तर सगळेच उच्चार बदलतात. बोलताना घाई म्हणून किंवा सवय म्हणून काही शब्द वेगळ्या तऱ्हेने उच्चारले जातात. उदा० नाही हा शब्द सर्रास 'नाय' असाच उच्चारला जातो. तृतीया विभक्तीचा 'ने' हा एकवचनी प्रत्यय हमखास 'नी' होतो. 'मग त्याने काय करायला पाहिजे' हे वाक्य 'मऽ त्यानी काय कराला पायजे ?' असं उच्चारलं जातं. 'हं' मधला महाप्राण एकूणच लोप पावत चालला आहे. 'पहा बुवा'च्या ऐवजी 'पआ' किंवा 'पा बुवा', 'माहीम'चं 'माईम', 'विहीर'चं 'विईर', 'वीर', 'व्हीर'; 'साधा'चं 'सादा'; 'अर्धा'चं 'अर्दा'; 'मधे'चं 'मदे' किंवा 'म्हदे', 'आधी'चं 'आदी' इ.

तसंच जोडाक्षरामधल्या पहिल्या अर्धाक्षराचं द्विरुक्तीकरण हीदेखील मराठीची एक प्रवृत्ती आहे. उदा० प्रत्यय - प्रत्त्यय, करन्यास - करन्न्यास, सुग्रास - सुग्ग्रास, पुण्य - पुण्ण्य, मृत्यू - मृत्त्यू, हृद्य - हृद्द्य इ. इथे हिंदीशी ताडून पाहता हिंदीत ही प्रवृत्ती नाही. तिथे अक्षरांती 'अ' हा स्वर असेल तर तो बहुतांशी अनुच्चारित ठेवण्याची प्रवृत्ती आहे. उदा० रंग - रंग्, युद्ध - युध्, कल्पना - कल्प्ना, मंगला - मंग्ला, पुत्र-पुतर् वगैरे. पण हिंदीमध्ये उच्चारानुसारी लेखनाची कल्पना कोणी उचलून धरल्याचं फारसं दिसत नाही.

हिंदीमधे तत्सम शब्द तंतोतंत संस्कृतानुसार लिहिले जातात. मराठीत मात्र गेल्या चाळीसपन्नास वर्षांत सर्व तत्सम शब्दांना तद्भव बनवलं गेलं आहे. त्यामुळे शालेय स्तरावर ज्या पायरीपर्यंत हिंदी भाषा सक्तीची आहे तिथपर्यंत मराठी विद्यार्थ्यांचा हिंदी

लिहिताना फारच गोंधळ उडतो व त्यांना कमी गुण मिळून त्यांचं नुकसान होतं. हिंदीतले अनुस्वार (नहीं, सांस, माँ, गायें, भैसें, भीं वगैरे) मराठी मुले सर्रास गाळूनच टाकतात.

महाराष्ट्राच्या शेजारी आजूबाजुला पाहिल्यास हिंदी, गुजराती व कोंकणी या भाषांमधे अनुस्वारांची रेलचेल आहे व ते उच्चारलेही जातात. गुजराती व कोंकणीमधे नपुंसकलिंगी शब्द पूर्वीच्या मराठीप्रमाणे अनुस्वाराने वेगळे दर्शवले जातात.

मराठीमधे रुळलेल्या इंग्लिश शब्दांचं उच्चारण व त्यानुसार लेखन यामधेही कुठलाही नियम लावताना कसरत करावी लागणार आहे. Teacher हा शब्द 'टिचर' असा उच्चारला जातो. 'क्लीन'चं 'क्लिन' होतं तर 'पिन' आणि 'क्लिप'चं 'पीन', 'क्लीप' वगैरे. 'फ्रिज' यासाठी 'फ्रीझ' हा शब्द रूढ झाला आहे. 'क्लीन चिट'च्या ऐवजी 'क्लिन चीट' आपल्याला वर्तमानपत्रात दिसतंच. जसजशी इंग्लिश माध्यमाची व्याप्ती वाढेल (ती वाढतेच आणि वाढणारच आहे) तसतसे योग्य इंग्लिश उच्चार मराठीत रूढ होतील. त्या वेळी या शब्दांच्या सध्याच्या रूपांना (मान्यताप्राप्त) शुद्ध ठरवणार की अशुद्ध ? आणि 'इस्पितळ', 'ठेसन', 'मिक्चर', 'टेंपरवारी', 'मुन्शीपाल्टी', 'पोष्ट', 'पेश्यल', 'गवर्मेंट' या शब्दांचं काय करणार ? की हे शब्द प्रमाणभाषेत नसणारच ?

सध्या इंग्लिशपेक्षा हिंदीमुळे मराठीत शब्द, विभक्तिप्रत्यय व क्रियापदांमधे बदल होण्यामागचा रेटा वाढला आहे. हिंदीत 'चल पडा', 'चल बसा', 'गिरा दिया', 'हँस पडे', 'चल दिये' अशी साहाय्यक क्रियापदं सहज वापरली जातात. मराठीत हे प्रमाण आतापर्यंत कमी होतं; पण आता शहरी तरुण मुलांच्या बोलण्यात खूपदा साहाय्यक क्रियापदं येतात. उदा० 'मी चालू पडलो.' 'त्याने सांगून दिलं ('टाकलं'च्या ऐवजी)', 'पुस्तक देऊन दिलं (दे दिया प्रमाणे)' वगैरे. 'मला मदत' ऐवजी 'माझी मदत', 'त्याने माझा गुन्हा केलाय' अशी वाक्यं हा हिंदीचा प्रभाव आहे. इंग्लिशमधला 'फॉर' हा शब्दसुद्धा मराठीत फार घुसखोरी करतोय. 'माझ्यासाठी ते काम खूप कठीण होतं', 'तिच्यासाठी काहीही क्षम्य आहे' इ.

अशा बदलत्या कलांना नियमांत बसवणं कठीणच आहे; कारण कल आणि प्रवृत्ती प्रदेश-कालानुसार झपाट्याने आणि अनेक तऱ्हांनी बदलत आहेत. 'बदलानुसार नियम' यापेक्षा 'नियमानुसार बदल' ही व्यवस्था कमी गोंधळाची ठरू शकते.

■

बी-6, पुष्पांजली, शहाजीराजे मार्ग, विलेपार्ले (पूर्व), मुंबई 400057.
दूरभाष : (22) 26837476, 9820720928



अनुक्रमणिका

# भाषाग्रहण व भाषाशिक्षण

रमेश पानसे

माणसाचे भाषाशिक्षण ही शास्त्रीय अंगाने समजावून घेण्याची एक मनोरंजक गोष्ट आहे. मुख्य म्हणजे, आपल्या नकळत्या अशा लहान वयातच आपले बरेचसे भाषाशिक्षण होऊन जाते. किंबहुना आपल्याला कळायला लागणे आणि भाषा येणे या दोन्ही गोष्टी हातात हात घालूनच होत असतात. आपल्याला कळायला लागते म्हणून भाषा येते आणि भाषा येते म्हणून आपल्याला कळायलाही चांगले लागते, असा परस्परसंबंधही शास्त्रात बांधून दाखविला आहे.

साधारणपणे मुलांनी वयाच्या आठव्या वर्षापर्यंत भाषा चांगल्या रीतीने आत्मसात केलेली असते. या भाषाशिक्षणाचे जरा बारकाईने अवलोकन केले तर कुतूहल वाटावे अशा तीन गोष्टी लक्षात येतील. एक, मुले आपली आपणच भाषा आत्मसात करीत असतात; कोणी त्यासाठी त्यांना काही 'शिकवणी' ठेवत नाही. ही भाषा आत्मसात करण्याची सुरुवातीची प्रक्रिया कशी असते याचे वर्णन नोअम चॉम्स्की (१९७९) यांनी केले आहे. मुलांच्या बोलण्यात सुरुवातीच्या काळात तुटकपणा, चुकीची सुरुवात, सरमिसळ आणि भाषेला पायाभूत असणाऱ्या योग्य अशा वाक्यरचनेची मोडतोड यांचे प्राबल्य असते... यातून खरे तर भाषेचा आदर्श असा पायाच मूल आत्मसात करीत असते; आणि ही खरी कौतुकाची बाब असते. आपण हेही लक्षात घ्यायला हवे की, मूल ही (आदर्श रचना) कोणत्याही शिकवणीशिवाय करीत असते. कारण हे ज्ञानग्रहण ते अशा काळात करीत असते की, ज्यावेळी त्याला कोणतीही गुंतागुंतीची बौद्धिक कामे करण्याची क्षमता नसते; म्हणजेच (भाषा ग्रहणाची) ही किमया बौद्धिकतेशिवाय होत असते.

दोन, या वयातील भाषा आत्मसात करण्याची प्रक्रिया अगदी सर्वच मुलांमध्ये ठरावीक पायऱ्यांनी पण अतिशय वेगाने होत असते. असे म्हणतात की, मुले या वयात, स्वत:चे जेवढे भाषाशिक्षण करतात, तेवढे करण्यासाठी प्रौढाला साठ वर्षे लागतील. मानसशास्त्रज्ञ एरिक लेनेबर्ग यांनी दिलेल्या पुढील आकृतीतून, मुलांच्या भाषाशिक्षणाच्या पायऱ्या स्पष्ट होतील. (केविन व ओजेमन, १९९४ : १९२).

## वयानुसार होणारे भाषाशिक्षण




(१) या आकृतीत, ८ ते ३६ महिने या कालावधीत एक शब्द, दोन शब्दांची विधाने, तीन ते पाच व अधिक शब्दांची वाक्ये या 'घटना' केव्हा सुरू होतात आणि केव्हा १०० टक्के पूर्णतेला जातात यांचाच उल्लेख आहे. आकृतीत तिसाव्या महिन्याचा उल्लेख आहे तो याचसाठी की या सुमारास मोठी वाक्ये (पाच शब्दांची इ०) उच्चारायला सुरुवात होते. छत्तिसाव्या महिन्याचा उल्लेख यासाठी आहे की, जवळपास या सुमारास वरील तीन 'घटना' जवळजवळ पूर्णतेला पोहोचतात.

(२) आकृतीत असेही दिसून येईल की ८-१६-२४ यांमधील अंतरापेक्षा थोडे जास्त अंतर २४-३६मध्ये आहे. ३२ या आकड्याला, येथे फारसा काही संदर्भ नसल्यामुळे तो टाळलेला आहे.

नंतरच्या परिच्छेदात असलेला १८ ते ३६ महिने हा उल्लेख आकृतीत वर्णिलेल्या घटनांशी संबंधित नाही. तो स्वतंत्रपणे, भाषेचे व्याकरण, स्वर इ०शी संबंधित आहे. (आणि या बाबी आकृतीत नाहीत.)

(३) आपणहून आपली भाषा शिकतानाच, मुले, भाषेचे व्याकरण, भाषेत वापरले जाणारे सर्वच स्वर आणि भाषेच्या सर्व लकबी अगदी कित्येक बारकाव्यांसहित आत्मसात करतात. वयाच्या १८व्या महिन्यापासून ते ३६व्या महिन्यापर्यंतच्या काळात, म्हणजे केवळ दीड वर्षांच्या काळात हे सर्व घडून येते.

या तीनही गोष्टी अतिशय आश्चर्यकारक आहेत. भाषा ही आपल्या इतकी अंगवळणी पडली आहे की तिच्यातील निसर्गदत्त आश्चर्ये बहुधा दुर्लक्षिली जातात. ही आश्चर्ये हाच भाषेच्या अभ्यासाचा सैद्धांतिक प्रदेश आहे. बालकाच्या नैसर्गिकरीत्या घडून येणाऱ्या भाषा-आकलनाचे हे सिद्धांत, (मानवी) आकलनविषयक प्रक्रिया आणि जवळजवळ प्रत्येकालाच वयाच्या तिसऱ्या वर्षापर्यंत वेगाने प्राप्त होणारे भाषाज्ञान

यांमधील परस्परसंबंधाच्या स्वरूपात, भाषेची निर्मिती आणि भाषेचे आकलन यांचे स्पष्टीकरण देतात. (बॉक, कॅथरीन व सुझन गार्नसी २००४ : २२६)

हा भाषाविकास कसा होतो, याला जबाबदार असणारी मेंदूची रचना आणि मेंदूचे कार्य कसे असते, याविषयीचे बरेच संशोधन आता पुढे आले आहे. त्याचबरोबर भाषाशिक्षणाची घडणारी ही प्रक्रिया उलगडण्याचे अनेक प्रयत्न मानसशास्त्राच्या क्षेत्रातही झालेले आहेत; त्यांची सैद्धांतिक बांधणीही केली गेली आहे. भाषेच्या क्षेत्रात माहितीप्रक्रिया-व्यवहार मनात कसा घडत जातो, हे सांगणारी मानसभाषाशास्त्र (सायकोलिंग्विस्टिक्स) अशी एक, मानसशास्त्र व भाषाशास्त्र यांच्यामध्ये संबंध बांधणारी, मानसशास्त्राची नवी उपशाखाही वाटचाल करू लागली आहे. भाषेचे मानसशास्त्र सांगणारी अशी ही ज्ञानशाखा आहे. मुलांबरोबर काम करणाऱ्यांना, तसेच बालशिक्षणाच्या व भाषाशास्त्राच्या अभ्यासकांना, व्यावहारिक आणि वैचारिक क्षेत्रात उपयुक्त ठरणारे असे हे सारे मज्जा-भाषाशास्त्रातील (न्यूरोलिंग्विस्टिक्स), मज्जामानसशास्त्रातील (न्यूरोसायकॉलॉजी), विकासक मानसशास्त्रातील (डेव्हलपमेंटल सायकॉलॉजी) आणि नव्या मानसभाषाशास्त्रातील संशोधन व विचारधन आहे.

**मेंदूविषयक संशोधन**

मानवामधील भाषाक्षमतेचा विकास ही घटना म्हणजे मानवाच्या सर्वसामान्यपणे (आणि इतर प्राण्यांच्या तुलनेत) वाढलेल्या बौद्धिक क्षमतांचा अप्रत्यक्ष परिणाम आहे, असे मानले जाते. या वाढत्या बुद्धिमत्तेला उत्क्रांतीच्या प्रक्रियेत कारणीभूत ठरलेली बाब म्हणजे माणसाच्या मेंदूचा वाढलेला आकार. सुमारे २० लाख वर्षांपूर्वी मेंदूचे आकारमान ५०० घनसेंमी इतके होते ते अगदी अलीकडे म्हणजे सुमारे दोन लाख वर्षांपूर्वी १५०० घनसेंटिमीटर पर्यंत पोचले (सरासरी १३०० घनसेंमी). मानवाच्या शरीराच्या आकारमानाच्या तुलनेत मेंदूच्या आकारमानात झालेल्या वाढीचा संबंध माणसाच्या बुद्धिमत्ता वाढीशी आहे असे मानले जाते. मानवाची स्मृती, माणसाची एकूणच आकलनक्षमता आणि त्याची भाषाक्षमता हे माणसाच्या बुद्धिमत्ता वाढीचे परिणामभूत घटक आहेत.

मानवी मेंदूचे आकारमान वाढले याचा अर्थ असा आहे की मेंदूमधील पेशींची म्हणजे मज्जापेशींची (न्यूरॉन्स) संख्या अफाट झाली. या पेशींची परस्परांशी काही 'हेतूपूर्ण' बांधणी होत असते. एका पेशीची इतर सुमारे दहा हजार पेशींशी जोडणी होत असते. जिथे जोडणी होत असते त्या जोडस्थानांना विवर (सिनॅप्स) असे म्हणतात. साहजिकच पेशींच्या संख्येच्या कितीतरी पट संख्या ही या विवरांची असते. प्रत्येक पेशीने मेंदूमधील आपापले स्थान ग्रहण केल्यानंतर त्यांना 'अक्ष' (ॲक्झॉन्स)

फुटायला व ते वाढायला सुरुवात होते. हे अक्ष आपल्याला ज्या ज्या दुसऱ्या पेशींच्या समवेत काम करायचे आहे त्या त्या दिशेने वाढतात व त्यांना, झाडांच्या मुळांसारख्या फांद्या फुटतात. यांना वृक्षिका (डॅन्ड्राईट्स) असे म्हणतात. या प्रक्रियेतच ज्या पेशींना काही काम मिळत नाही त्या नष्ट होण्याची प्रक्रियाही चालू असते; आणि असलेल्या पेशींचे शरीरातील विविध अवयवांच्या संदर्भातील गुंतागुंतीचे कार्य वेगाने चालू लागते. या साऱ्या घटनांची दिशा जनुकांकरवी प्राप्त झालेली असते.

अशा प्रकारच्या मेंदूच्या गुंतीगुंतीच्या रचनेत आणि कार्यात मानवी भाषाक्षमतेचा उगम आहे असे मानले जाते. भाषा बोलण्यासाठी लागणारी स्वरयंत्रणा, भाषा आकलनासाठी लागणारी 'बौद्धिक क्षमता', भाषेची मौखिक वा लिखित क्षमता या साऱ्या गोष्टी मेंदूतील प्रक्रियांचा परिपाक असतात.

माणसाच्या भाषाक्षमतेच्या अंगाने मेंदूचा अभ्यास सुरू झाला तो इस्पितळांतून मेंदूइजा झालेल्या रोग्यांच्या संदर्भातील दृष्टोत्पत्तीस आलेल्या काही घटनांतून. मेंदूला विशिष्ट ठिकाणी इजा आणि त्याचा दृश्य परिणाम म्हणून दिसून येणारा रोग्याच्या वागण्यातील फरक यावरून, मज्जावैद्यांनी (न्यूरॉलॉजिस्ट्स) या दोन्हीत परस्परसंबंध बांधायला सुरुवात केली. भाषाक्षमतेच्या संदर्भातील असा पहिला प्रयत्न पॉल ब्रोका यांनी एकोणिसाव्या शतकात केला. ब्रोका यांनी १८६१ साली असे दाखवून दिले की, ज्या रोग्याची बोलण्याची क्षमता बाधित झाली आहे, त्याच्या मेंदूमध्ये विशिष्ट ठिकाणी इजा किंवा जखम झालेली आहे. हा विशिष्ट भाग म्हणजे मेंदूच्या फ्रंटल लोबमध्ये डाव्या आणि खालच्या बाजूला असलेला एक विशिष्ट भाग होय. (मेंदूमधील हे विशिष्ट केंद्र तेव्हापासून 'ब्रोकाक्षेत्र' म्हणून ओळखले जाते.) अपघात किंवा अन्य काही कारणांनी (म्हणजे पक्षाघातासारख्या आजारांनी) जर मेंदूमधील हे ब्रोकाकेंद्र 'जखमी' झाले तर त्याचा माणसाच्या वाचेवर परिणाम होतो, याला वाचाबाधा (अॅफेशिया) असे म्हणतात. म्हणजे वाचा निर्मितीचे, बोलता येण्याचे असे हे मेंदूमधील ब्रोका केंद्र असते. अशा रोग्याच्या वाचेवर परिणाम झाला तरी त्याचा इतरांनी बोललेल्या भाषेच्या आकलनावर, दुसऱ्याचे बोलणे समजण्यावर मात्र काहीही परिणाम झाल्याचे दिसून येत नाही. मात्र ब्रोकाच्याच पाठोपाठ, म्हणजे १८७४ साली कार्ल वर्निक यांनी असेच एक केंद्र मेंदूमधील डाव्या बाजूला टेंपोरल लोबमध्ये कानाच्या जरा वरच्या बाजूस दाखवून दिले. अपघातात जखम होऊन हे केंद्र बाधीत झालेल्या रोग्यांची वाचा – बोलण्याची क्षमता – नीट असते; पण त्यांना इतरांचे बोलणे नीटपणे समजून घेता येत नाही. भाषा समजून घेणे याचा अर्थ दुसऱ्याच्या लिहिण्या-बोलण्यातील वाक्यांचा अर्थ, आशय समजणे; आणि नेमकी ही क्षमता उपयोगात



अनुक्रमणिका

आणणे हे वर्निक यांनी दर्शविलेल्या या केंद्राचे (आता याला 'वर्निक क्षेत्र' म्हणून ओळखले जाते !) काम असते. जेव्हा या केंद्रात काही बिघाड होतो तेव्हा या भाषा आकलनाच्या कार्यात अडथळा निर्माण होतो.

भाषेचे केंद्र डाव्या मेंदूत विशिष्ट ठिकाणी असते, हा ब्रोकाचा शोध हा मानवी मेंदूच्या डाव्या व उजव्या भागात कार्ये विभागलेली आहेत हे सिद्ध करणारा पहिला-वहिला शोध होता. याहूनही महत्त्वाचे म्हणजे, मेंदूची विशिष्ट कार्ये विशिष्ट ठिकाणाहून होतात, याचा अर्थ असा की, मेंदूचे रचनाशास्त्र (ॲनॉटॉमी) आणि मेंदू जे काही काम करतो, व जे काही वेळेस माणसाचे मन म्हणून ओळखले जाते, यांमध्ये परस्पर संबंध असल्याचे, ब्रोकाच्या या शोधाने दाखवून दिले आहे. (कार्ल सॅगन, १९७९ : ९-१०)

ब्रोका व वर्निक यांच्या अभ्यासांतून असे लक्षात आले की भाषेच्या संदर्भात कार्य करणारी केंद्रे मेंदूच्या डाव्या भागात विशिष्ट ठिकाणी वसलेली असतात. ब्रोका केंद्र हे भाषा निर्मितीशी संबंधित असते तर वर्निक केंद्र हे भाषा-आकलनाशी संबंधित असते. पुढे संशोधनातून असेही लक्षात आले की, जी माणसे डावखुरी असतात त्यांच्या मेंदूच्या उजव्या भागातील जखमांचा संबंध भाषिक दोषांमध्ये परिणत होतो. तसेच उजव्या मेंदूला इजा पोहोचलेल्या रोग्यांच्या काही विशिष्ट स्तरावरची भाषिक क्षमता म्हणजे भाषेचे बारकावे लक्षात येणे, विनोद समजणे इत्यादींमध्ये अडथळे निर्माण होतात. (टेरीन्स डीकॉन २००४ : २१२)

मेंदूमधील ब्रोकाक्षेत्र किंवा वर्निकक्षेत्र ही आज भाषेच्या संदर्भातील वेगवेगळ्या प्रक्रिया करणारी क्षेत्रे म्हणून ओळखली जातात. भाषा बोलण्यासाठी लागणाऱ्या स्वरयंत्राचा तसेच तोंडामधील जीभ, टाळू व दात इत्यादी अवयवांचा उपयोग प्रत्यक्ष मुखावाटे शब्द बाहेर पडण्यासाठी केला जातो. यात गमतीचा भाग असा की ब्रोकाक्षेत्र हे, अशा शब्द उच्चारणाऱ्या स्नायूंचे नियंत्रण करणारा मेंदूमधील जो भाग असतो (ओरल मोटर कॉर्टिक्स) त्याच्या जवळ वसलेले आहे; तर वर्निक क्षेत्र हे अशाच प्रकारे भाषा ऐकण्याच्या कानासारख्या अवयवांचे नियंत्रण करणाऱ्या टेंपोरल लोबमधील भागाजवळ वसलेले आहे. यांमुळे त्यांच्यातील संदेशांची देवाण-घेवाण सुकर होते.

भाषेचा व्यवहार हा मेंदूमध्येसुद्धा अत्यंत गुंतागुंतीचा असतो. त्यामुळे त्यांचे असे एखाद-दुसरे केंद्र असते, हा विचार अलीकडे मागे पडत चालला आहे. विशेषत: अलीकडच्या काही काळात फोटो इमेजिंगसारखी, मेंदूशोध घेणारी काही साधने अवगत झाल्यामुळे मेंदूमधील पेशींची गुंतागुंतीची रचना आणि पेशींच्या परस्परसंबंधातून केली जाणारी कार्ये, यांवर अधिक प्रकाश पडला आहे. इलेक्ट्रिक कॉर्टिकल स्टिम्युलेशन,

रेडिओलेबल्ड रिजनल सेरिब्रल ब्लड फ्लो, पॉझिट्रॉन एमिशन टोमोग्राफी आणि फंक्शनल मॅग्नेटिक् रेझोनन्स इमेजिंग अशा प्रकारची साधने वापरून मेंदूप्रदेशाचा शोध घेण्याचे शास्त्रज्ञांचे काम चालले आहे.

वास्तविक पाहता इलेक्ट्रिकल स्टिम्युलेशन, म्हणजे विशिष्ट ठिकाणी विजेचा बारीकसा धक्का देऊन होणाऱ्या परिणामांचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न, एकोणिसाव्या शतकातच झाला होता. परंतु अधिक नेटकेपणाने मानवी मेंदूचा अभ्यास केवळ कुतूहलाकडून वैद्यकीय संशोधनाकडे वळला तो मेंदूशल्यचिकित्सक विल्डर पेनफिल्ड यांच्या १९५०च्या दशकातील कार्यामुळे. त्यातही भाषेच्या अंगाने अशाप्रकारच्या शास्त्रीय अभ्यास प्रामुख्याने पुढे आला आहे तो अलीकडच्या काही दशकांतील जॉर्ज ओजेमन आणि त्यांच्या सहकाऱ्यांच्या अभ्यासांतून (टेरीन्स डीकॉन, २००४ : २१३). या अभ्यासांतून असे दिसून आले आहे की भाषानिर्मिती आणि भाषा-आकलन ही कार्ये मेंदूच्या विविध भागांत पसरलेली आहेत. त्या कामांत मेंदूच्या विविध भागांतील पेशी वेळोवेळी भाग घेत असतात. यांमध्ये प्रीफ्रंटल लोब, पेरिएटल लोब, मेडिअल फ्रंटल कॉर्टेक्स किंवा सप्लीमेंटरी मोटर कॉर्टेक्स असे मेंदूविभाग, भाषा प्रक्रियांमध्ये विशेषकरून सहभागी होत असतात. मात्र प्रत्यक्षपणे या संदर्भातील अखेरची वितरण-व्यवस्था असते ती ब्रोकाकेंद्र, वर्निककेंद्र, किंवा अलीकडे नव्याने निदर्शनास आलेले गेशविंड केंद्र यांच्याकडे.

**भाषेचा आकलनविषयक दृष्टिकोण :** अलीकडच्या काळात, भाषेकडे एक आकलनविषयक क्षमता (कॉग्निटिव्ह ॲबिलिटी) म्हणून पाहण्याकडे कल निर्माण झाला आहे तो नोअम चॉम्स्की यांच्या सैद्धांतिक विवेचनामुळे. भाषा ही केवळ एक सांस्कृतिक प्रतीक नाही तर तिची पाळेमुळे ही शरीरविज्ञानात रुजलेली आहेत, हे प्रामुख्याने चॉम्स्की यांनी दाखवून दिले आहे. त्यांच्या या दृष्टिकोणाला 'नेटिव्हिस्ट' दृष्टिकोण म्हटले जाते. याच सुमारास आकलनविषयक मानसशास्त्राच्या क्षेत्रात झालेल्या विकासामुळे, व्यक्ती या आपले भाषाज्ञान कशाप्रकारे उपयोगात आणतात, याविषयीच्या संशोधनाला चालना मिळाली. या संशोधनाची मुख्य दिशा होती ती म्हणजे, वाक्ये वाचून किंवा ऐकून त्यांचे स्पष्टीकरण करणे, व त्यातील संकल्पना समजावून घेणे या गोष्टी नेमक्या कशा घडतात याचा शोध घेणे. अशा तऱ्हेच्या संशोधनांचा मुख्य निष्कर्ष असा होता की, वाचणे वा ऐकणे या प्रकिया घडत असताना यांतील शब्द फारसे लक्षात न राहता, त्यातून कोणता आशय व्यक्त केला आहे हे प्राधान्याने लक्षात ठेवले जाते. (कॅथरिन बॉक व गार्नसी सुझन, २००४ : २२६).

भाषेची रचना आणि भाषाग्रहणक्षमता यांविषयी चॉम्स्की यांनी मांडलेले विचार

मोलाचे मानले जातात. मनुष्याच्या मेंदूमध्ये निसर्गत:च काही बौद्धिक संरचना आढळून येतात. त्यांचे कार्य विशिष्ट तऱ्हेने चालत असते; आणि यामुळेच प्रत्येक माणसाला भाषा ग्रहण करण्याची क्षमता प्राप्त होत असते. चॉम्स्की यांनी आपल्या अभ्यासात अधिक लक्ष केंद्रित केले होते ते वाक्यरचना (सिंटॅक्टिक नॉलेज) आणि त्या अनुषंगाने शब्दार्थांच्या (सिमॅन्टिक नॉलेज) आकलनावर. प्रत्येक भाषेचे स्वत:चे नियम असतात, व्याकरण असते. मुले या सर्वांसह भाषा, अगदी लहान वयातच ग्रहण करीत असतात. अशी नियमांची व्याकरण व्यवस्था सर्वच भाषांच्या वापराच्या मुळाशी असते. चॉम्स्की त्याचे वर्णन 'वैश्विक व्याकरण' (युनिव्हर्सल ग्रामर) असे करतात. हे वैश्विक व्याकरण ही माणसाची उपजत अशी क्षमता असते. आणि हिच्यामुळेच मुले आपापल्या परिसरातील भाषा व्याकरणसहित सहजतेने आत्मसात करतात, असा चॉम्स्की यांच्या विचारांचा, थोडक्यात आशय आहे.

नोअम चॉम्स्की यांच्याच विचारांचा धागा पुढे नेताना स्टिव्हन पिंकर म्हणतात की, भाषा ही केवळ सांस्कृतिक निर्मिती नाही तर ती एक उपजत घटना आहे... भाषा ही अगदी नेटकेपणाने बांधली गेलेली शरीरवैज्ञानिक घटना आहे. (स्टिव्हन पिंकर, १९९४ : १९९). पिंकर असेही नमूद करतात की, इतिहासात कुठेही मूक संस्कृती आढळलेली नाही. अगदी खूप जुन्या संस्कृतींतही नाही. उदाहरणार्थ, १९६०च्या दशकात जेव्हा अश्मयुगातील काही जमाती न्यू गिनीच्या प्रदेशात सापडल्या, तेव्हा त्यांच्यामधील सुमारे आठशे (नवीन) भाषांचा शोध लागला. त्यांतील प्रत्येक भाषा ही स्वत:च एक गुंतागुंतीची रचना होती. प्रत्येक भाषेची भाषिक अंगे जरी वेगवेगळी असली त्यांचा विकास आणि वापर सर्वच संस्कृतीत आढळून येतो. अशाप्रकारे भाषा ही सर्वच संस्कृतीत अस्तित्वात असल्याने, पिंकर निष्कर्ष काढतात की, तिचा उगम हा संस्कृतिप्रणित असण्यापेक्षा, तो मानवाच्या शरीरवैज्ञानिक उपजत क्षमतेचा भाग आहे (बेव्हरली ओट्टो, २००२ : २५). थोडक्यात असे की, भाषेविषयीचा 'नेटिव्हिस्ट' दृष्टिकोण असे मांडतो की, मुले आपल्या परिसरातील भाषेची संरचना लक्षात घेऊनच भाषा शिकत असतात. अशाप्रकारे भाषा शिकण्यासाठी साहाय्य करणारी काही खास यंत्रणा माणसाच्या मेंदूत असते. तिला भाषाग्रहण यंत्रणा (लॅन्ग्वेज अक्विझिशन डिव्हाईस) असे चॉम्स्की यांनी म्हटले आहे (बेव्हरली ओट्टो, २००२ : २५). याचा व्यावहारिक अर्थ असा की या नैसर्गिक भाषाग्रहण यंत्रणेचा वापर करून मुले आपली आपणच भाषाशिक्षणाची इमारत उभी करीत असतात.

**भाषा आकलनाचा पियाजेचा दृष्टिकोण :** मुले भाषा कशी आत्मसात करतात याविषयीचा एक वेगळा दृष्टिकोण ज्यॉ पियाजे यांनी मांडला आहे. पियाजेने मुलांच्या

बौद्धिक विकासाच्या बाबतीत सैद्धांतिक विवेचन केले आहे. पियाजेच्या या दृष्टिकोणाला मानसशास्त्रात 'आकलनविषयक दृष्टिकोण' (कॉग्निटिव्ह पर्स्पेक्टिव्ह) असे संबोधले जाते. भाषा शिक्षणाविषयी त्याने मांडलेली भूमिका अशी की, भाषाविकास हा बौद्धिक विकासावर अवलंबून असतो. बौद्धिक विकासाच्या विशिष्ट टप्प्याला, उदाहरणार्थ, २ ते ७ वयामध्ये – म्हणजे पियाजेच्या भाषेत 'कार्यपूर्व अवस्थेत' (प्री ऑपरेशनल स्टेज) – विशिष्ट पातळीचे भाषाग्रहण होत जाते. यापूर्वीच्या, म्हणजे संवेदनशील अवस्थेत (सेन्सरी मोटर स्टेज) दोन वर्षांच्या आतल्या मुलांचे हुंकार देणे, नुसती स्वर-बडबड करणे याला पियाजेने भाषा मानलेले नाही. त्याच्या मते या वयातील मुले भाषापूर्व अवस्थेत असतात, या काळातील त्यांचा बौद्धिक विकास हा सर्वस्वी त्यांच्या शारीर संवेदनांशी संलग्न असतो. मुलांना जोवर ऐकलेल्या शब्दांच्या मानसिक प्रतिमा निर्माण करता येत नाहीत तोवर मुलांचे भाषाग्रहण सुरू होत नाही. वस्तूंच्या काय किंवा शब्दांच्या काय, मानसप्रतिमा (स्किमा) तयार करता येणे ही एक विशिष्ट 'बौद्धिक' पात्रता असते आणि पियाजेच्या म्हणण्याप्रमाणे, ही अमूर्त पात्रता साध्य झाल्याशिवाय भाषाग्रहण होत नसते.

जेव्हा भाषिक वर्तन म्हणजे भाषा-वापर सुरू होतो तेव्हा विचार करण्याची शक्ती अधिक व्यापक होते, अधिक वेगानेही होते, असे पियाजे म्हणतो. (बॅरी वर्डस्वर्थ, १९७१ : ६). अर्थात यासाठी सुद्धा, यापूर्वी संवेदनकारक कृती (सेन्सरी मोटर ऑपरेशन) करण्याची परिपक्वता मुलांमध्ये यावी लागते, कारण अशी परिपक्वता हाच भाषा विकासाचा पाया आहे; असे पियाजेचे प्रतिपादन आहे. (बॅरी वर्डस्वर्थ, १९७१ : ७९) अशा संवेदनकारक कृतींद्वारे मानस. प्रतिमा निर्माण होण्याची गरज भाषाविकासासाठी असली तरी, आणि भाषाविकास हा बौद्धिक विकासाला मोठे साहाय्य करीत असला तरी ती त्याची पूर्वअट नव्हे. कारण, पियाजेच्या मते, बालकाची बौद्धिकता त्याच्या भाषाविकासापूर्वीच अस्तित्वात आलेली असते. पियाजेने आपल्या 'सिक्स सायकॉलॉजिकल स्टडीज'मध्ये लिहिले आहे : ''खरं तर बौद्धिकता ही भाषेच्या कितीतरी आधी अस्तित्वात येत असते; म्हणजेच अंतर्गत विचारांच्या खूप आधी या भाषिक विकासात मौखिक उच्चार (आत्मनिष्ठ भाषा) अंतर्भूत असतात. तसेच बौद्धिकता म्हणजे वस्तूंच्या साहाय्याने आत्मसात केलेली व्यावहारिक बौद्धिकता असते. ही शब्द व संकल्पना यांच्या जागी संबोध (पर्सेप्ट) व हालचाल यांचा वापर करून निर्माण झालेली कृतिशील प्रतिमा (ॲक्शन स्किमा) असते. उदाहरणार्थ, एखादी दूरची वस्तू काठीने ओढून घेणे ही बौद्धिक कृती असते. (आणि ही तशी उशिरा म्हणजे अठराव्या महिन्यांच्या सुमारास विकसित होत असते.) यात ठरविलेले उद्दिष्ट



अनुक्रमणिका

गाठण्यासाठी साधनाचा वापर करून केलेली कृती असते... अशी अनेक उदाहरणे देता येतील'' (बॅरी वर्डस्वर्थ, १९७१ : ६७).

**भाषेचे सामाजिक अंग :** भाषाग्रहण प्रक्रिया ही जेवढी उपजत, नैसर्गिक असते, तेवढीच ती समाजसंबंधितही असते. लहान वयात मुलांना इतर माणसांच्या सहवासात राहायला मिळाले तरच त्यांची नैसर्गिक असलेली भाषाग्रहण क्षमता फुलू लागते; उत्पादक बनते. कारण भाषा, भाषेचे नियम, व्याकरणाची गुंतागुंत या साऱ्या मानवी म्हणजे समाजनिर्मित गोष्टी आहेत. त्यामुळे आपल्या सहवासातील प्रौढांकडे पाहून, त्यांना ऐकून, त्यांच्याशी संवाद साधून आपल्या बालपणापासून मुले भाषा आत्मसात करीत जातात. सुरुवातीच्या काळात संबंधित प्रौढांची अप्रत्यक्षपणे मदत ती घेत असतात. म्हणजे असे की या प्रौढांनी जाणूनबुजून, अगदी ठरवून मुलांना मदत केली नाही तरी, मुले भाषा शिकतातच. अगदी तीन-चार वर्षांची मुले रोज सरासरीने दहा-बारा शब्दांची भर आपल्या भाषेच्या ज्ञानात घालत असतात. आत्मसात झालेला शब्द वापरून पाहण्याची सुद्धा त्यांना घाई झालेली असते. याच काळात मुलांच्या भाषा-शिक्षणाला प्रौढांची मदत झाली तर भाषाशिक्षणाची ही प्रक्रिया अधिक वेगाने होते.

या वयातील भाषा-शिक्षणाबाबत कुतूहलाची बाब अशी की, मुले केवळ (इतर प्रौढांच्या) निरीक्षणाने भाषा आत्मसात करतात; वस्तू दर्शवून, तिचे नाव सांगून नव्हे. काही वेळा तर मुले, त्यांना बोलता न येण्याच्या वयात त्यांनी ऐकलेले-वेचलेले शब्दही बोलतात, तेव्हा पालकांना त्याचा मोठा अचंबा वाटतो (केविन व ओजेमन, १९९४ : १९२). पुढे अर्थपूर्ण शब्दांकडून अर्थपूर्ण वाक्यांकडे मुले वळतात, तेव्हा मात्र प्रयत्न-प्रमाद पद्धतीने व्याकरणाचे नियम मुले आत्मसात करतात. वयाच्या दीड वर्षांपासून ते तीन वर्षांपर्यंतच्या काळात चार-पाच शब्दांची वाक्ये मुले सहजतेने बोलू लागतात. याच वयात मुलांना, आपल्या आजूबाजूच्या वातावरणात, वाक्यरचना-निर्मितीचा सराव करण्याची संधी मिळावी लागते. ती फार उशिरा म्हणजे शाळेच्या वयात मिळून चालत नाही. वयाच्या १८व्या महिन्यापासून ते ३६व्या महिन्यापर्यंतच्या काळात निदान एका भाषेच्या वाक्यरचनेचे तंत्र आत्मसात झाले तर ते नंतरच्या काळात दुसरी भाषा शिकण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. (केविन व ओजेमन, १९९४ : १९५-१९६) साधारणपणे सहाव्या वर्षापर्यंतचा काळ हा भाषा शिकण्याच्या दृष्टीने अत्युच्च कालावधी असतो. याला भाषा-आकलनाच्या 'संधींची गवाक्षे' असे मज्जाशास्त्रीय तांत्रिक भाषेत संबोधतात. हा कालावधी मुलांच्या भाषाग्रहणाच्या बाबतीत अति महत्त्वाचा असतो; आणि संबंधित प्रौढांच्या दृष्टीने आपल्या पाल्यांच्या भाषाशिक्षणावर आपले ध्यान केंद्रित करण्याचा असतो.

**भाषाविषयक परस्पर-क्रिया दृष्टिकोण (इंटरॅक्शनल पर्स्पेक्टिव्ह) :** जन्माला आल्याबरोबर बाळाचा बाह्य जगाशी संबंध प्रस्थापित होऊ लागतो. हा संबंध मुलाच्या विकासाचे स्वरूप आणि दिशा ठरविण्यात जसा प्रभावी ठरतो तसाच तो मुलाच्या भाषा-आकलन-प्रक्रियेच्या दृष्टीने अद्‌भुत आणि आवश्यक असा असतो. या संदर्भात मानसशास्त्राच्या क्षेत्रात प्रचलित असलेली दोन उदाहरणे प्रसिद्ध आहेत. एक आहे लांडग्यांच्या कळपात वाढलेल्या मुलाचे. सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी हा मुलगा लांडग्यांच्या कळपात सापडला. तोवर तो तेरा-चौदा वर्षांचा झाला होता. प्रसिद्ध शिक्षण - मानसशास्त्रज्ञ इटार्ड याने या मुलाचा प्रत्यक्षात अभ्यास केला तेव्हा त्याला असे आढळले की, या मुलाच्या सर्व सवयी, वृत्ती या लांडग्याच्याच आहेत. 'माणूस' म्हणून त्याची वाढच झालेली नाही. साहजिकच मानवी भाषेपासूनही तो दूर होता. दुसरे उदाहरण आहे ते जेनी या लहानग्या मुलीचे. तिच्या विकृत बापाने तिला घरातल्याच एका लहानशा अंधाऱ्या खोलीत कुलुपबंद करून ठेवले होते. वयाच्या तेराव्या वर्षी ती सापडली. मध्यंतरीच्या काळात तिचा समाजाशी अजिबातच संबंध येऊ दिला गेला नव्हता. जे काही आवाज तिच्या कानावर पडले ते भिंतींच्या पलीकडून. सर्वसामान्य बुद्धिमत्ता असूनही ती भाषा आत्मसात करू शकली नाही. ही उदाहरणे अर्थातच समाजसंपर्क आणि भाषाविकास किंवा भाषाग्रहण यांच्या संबंधाविषयींची बोलकी उदाहरणे आहेत.

मुले प्रामुख्याने भाषाग्रहण करतात ती आपल्या संपर्कात येणाऱ्या व्यक्तींशी संवाद साधण्याच्या प्रयत्नांतून. या प्रयत्नांतून ग्रहण केली जाणारी भाषा व्यवहाररूप असते. जी भाषा आजूबाजूच्या वातावरणात प्रामुख्याने वापरात असते तीच भाषा मुले आत्मसात करतात; तसेच त्या भाषेचे जे व्यवहाररूप ती अनुभवतात तेच स्वरूप ती ग्रहण करतात. थोडक्यात असे की मुलांच्या भाषाग्रहणाच्या प्रक्रियेला आजूबाजूचे वातावरण साहाय्य करीत असते. हे आजूबाजूचे भाषिक वातावरण ही भाषाग्रहणाची साहाय्यव्यवस्था (लँग्वेज ॲक्विझिशन सपोर्ट सिस्टिम) मानली जाते (जेरोम ब्रुनर, १९८३).

**वायगोटस्कीचा भाषा-विचार :** भाषाग्रहण आणि सामाजिक संवादाची साहाय्य-व्यवस्था यांमधील संबंध सैद्धांतिक पातळीवर मांडण्याचा महत्त्वाचा प्रयत्न केला आहे तो लेव्ह वायगोटस्की या रशियन मानसशास्त्राने. भाषावापर हे मानवी मनाचे एक उच्च स्तरावरचे कार्य आहे, असे वायगोटस्की मानतो. आणि... ''उच्च मानस कार्ये ही समाजनिर्मित असतात; आणि त्यांचे वितरण संस्कृतीकरवी होते,'' असे वायगोटस्कीने म्हटले आहे (लेव्ह वायगोटस्की, १९७८ : १२६).

नैसर्गिक अधिष्ठान असलेली माणसाची दोन भाषाकार्ये आहेत. एक स्वत: भाषा बोलणे आणि दुसरे, इतरांनी बोललेली भाषा आकलन करणे. ही दोन्हीही कार्ये जेवढी माणसाच्या मेंदूमधील स्थान-प्रक्रियांशी संबंधित आहेत तेवढीच ती समाजाशी होणाऱ्या संपर्काशी संबंधित आहेत. मुलाला बोलता येण्याचा संबंध विशिष्ट भाषा भरपूर प्रमाणात ऐकायला मिळण्याशी आहे. कर्णबधिरतेमुळे ज्यांना ऐकण्याचीच क्षमता नाही त्यांना बोलणेही दुरापास्त असते, हे आपल्याला ठाऊक आहेच. परंतु एवढेच नाही; ज्यांना लहान वयात भाषा ऐकण्याची संधीच अल्प प्रमाणात मिळते, त्यांचा भाषाविकासही मर्यादित होतो, असे संशोधनातून आढळून आले आहे. अमेरिकेतील तीन वर्षे वयाच्या मुलांचा एक अभ्यास असे दाखवून देतो की, व्यावसायिक असलेल्या पालकांच्या मुलांना या वयात सरासरीने १३०० शब्द माहीत होते तर तेथील कल्याणकारी योजनांवर जगणाऱ्या (म्हणजे गरीब व बेकार असणाऱ्या) पालकांच्या मुलांना केवळ ५२५ शब्दच माहीत होते (सायमन ब्रॅण्डी, २००२).

'वाचेची मुळे समाजात आहेत' असे वायगोटस्की म्हणतो ते यामुळेच की, भाषा बोलता येते, म्हणजे वाचा विकसित होते ती समाज-संपर्कांतून आणि समाजसंवादांतून. जेव्हा परस्पर संवाद साधला जातो, भाषा ऐकणे-बोलणे-ऐकणे-बोलणे असे चक्र सुरू होते तेव्हाच भाषेची, बोलणे आणि आकलन ही दोन्ही कार्ये विकसित होत जातात.

या लहान वयात आणि भाषेचा वापर व्यवस्थितरीत्या करता येऊ लागला की मुले, बऱ्याचदा, एकटीच स्वत:शी बोलत राहतात. ही त्यांची आत्मकेंद्री भाषा (इगोसेन्ट्रिक स्पीच) असते. मुलांच्या भाषा-विकासात आणि एकूणच त्यांच्या बौद्धिक विकासात या आत्मकेंद्री बोलण्याचे काही महत्त्व असते. हे महत्त्व नेमके काय आहे याबाबत मानसशास्त्रांमध्ये मतभेद आहेत. पियाजे याने याबाबत अशी भूमिका मांडली आहे की, आत्मकेंद्री भाषा ही तार्किक विचार आणि समाजभाषा यांच्या पूर्वतयारीची भाषा असते. तर वायगोटस्कीची भूमिका अशी आहे की, ही भाषाच पुढे माणसाची अंतर्गत (मनातली) भाषा म्हणून विकसित होते. व्यवहारात, आत्मकेंद्री भाषा आणि समाजभाषा यांचा वापर एकाच वेळी मुले करीत असतात. वायगोटस्की मुळातच असे मानतो की भाषेचे मुख्य कार्य हे सामाजिकच असते आणि मुलांची आत्मकेंद्री भाषा काय किंवा व्यवहारात ते वापरत असलेली समाजभाषा काय, या दोन्हींचा वापर मुले एकाच वेळी करीत असतात.

भाषाग्रहणाच्या संदर्भातला आणखी एक सैद्धांतिक मुद्दा वायगोटस्की मांडतो; आणि तो म्हणजे भाषाग्रहण आणि विचारक्षमता यांच्या परस्परसंबंधाचा. त्याच्या मते, या दोन्ही प्रक्रिया स्वायत्त आहेत; पण, त्या एकाच वयात घडून येत असतात; आणि

त्या परस्परांना साहाय्य करीत असतात (लेव्ह वायगोटस्की, १९६२). अगदी बाळाच्या वयाच्या पहिल्या वर्षात बाळ हुंकार देते, तोंडाने आवाज काढते, निरर्थक बडबडते त्याचा, वायगोटस्कीच्या मते, 'विचारां'शी काही संबंध नसतो. ती मुलाची केवळ 'भावनिक' वागणूक असते. त्यानंतर मात्र साधारणपणे दुसऱ्या वर्षाच्या वयाच्या आसपास भाषा आणि विचार यांचा परस्पर संबंध बांधला जातो. वाचा बुद्धिमत्तेला चालना देते तर विचार वाचेकरवी अभिव्यक्त होऊ लागतात. मुख्य घटना अशी घडते की प्रत्येक वस्तूला काही नाव आहे याचे आकलन मुलाला होऊ लागते. हा शोध जेव्हा मुलांना लागतो तेव्हा तो मुलांना प्रेरणादायक ठरतो. आणि मग मुले, जग आकळून घेण्यासाठी भाषेच्या वापराचा अधिकाधिक आधार घेऊ लागतात (बेव्हरली ओट्टो, २००२ : २८). शब्दांचे अर्थ समजू लागणे ही बालकाच्या भाषा-ग्रहणातील एक महत्त्वाची पायरी असते. वायगोटस्कीच्या मते, शब्दार्थग्रहण ही संकल्पना भाषेचे ग्रहण आणि भाषेतील उच्चार यांच्यामधली पायरी आहे. (अब्राहमसेन एडेल, २००४ : १५०). शब्दार्थांच्या आकलनापासून भाषेचे आकलन सुरू होते. पुढे वाक्यरचनेच्या आकलनापासून ते अधिक व्यामिश्र होत जाते. वाक्यरचनेतून अर्थग्रहण होणे आणि अर्थाभिव्यक्तीसाठी वाक्यरचना करता येणे ही लहान वयातील अत्युच्च अशी भाषिक करामत असते. वयाच्या तिसऱ्या वर्षानंतर ही स्थिती मुले वेगाने गाठू लागतात. कारण, या वयाला तीनपेक्षा अधिक शब्दांची अर्थपूर्ण वाक्ये मुले वापरू लागतात. चुका करीत, नवनवे अर्थावलोकन करीत, त्याचा वापर करीत प्रयत्नांती ही स्थिती मुले गाठत असतात.

**लहान वयातील भाषाशिक्षण :** या वयातील भाषाशिक्षणाला रीतसर किंवा पद्धतशीर साहाय्य होणे ही बालकाच्या भाषाविकासातील महत्त्वाची बाब ठरते. या काळात मुलाला केवळ शब्द (वा चिन्हे) यांपेक्षाही अधिक काही हवे असते. दोन व तीन शब्दांच्या वाक्यांव्यतिरिक्तही अधिक काही जरूर असते. मुलाला आपल्या दैनंदिन व्यवहारांच्या वातावरणातच वाक्यरचनेचा शोध घेण्याची संधी मिळाली पाहिजे. आणि हा असा अनुभव मुलाला त्याच्या तिसऱ्या वर्षाच्या दरम्यानच मिळायला हवा. तो फार उशिरा शाळेत मिळून उपयोगी नाही (केविन व ओजेमन, १९९४ : १९५-१९६). यामुळेच शालेयपूर्व वय हा भाषाविकासाचा सर्वोत्तम काळ मानला जातो तो यामुळेच. या विशिष्ट वयातच भाषा-शिक्षणाचे विविध अनुभव ही मुलांची गरज असते. भाषा ऐकण्याचे, बोलण्याचे, पाहण्याचे, भाषेकरवी विचार करण्याचे, कल्पना लढविण्याचे, दुसरी भाषा-तिसरी भाषा आत्मसात करण्याचे, भाषेशी खेळण्याचे, भाषा वळवून-वाकवून पाहण्याचे, शब्दांच्या उच्चारांवरून त्यांचे गट बांधण्याचे, कवितेतल्या

लयबद्ध भाषेचे, विनोदातल्या 'विपरीत' भाषेचे असे अनेक अनुभव मुलांना या वयात मिळावे लागतात. या काळातील ही 'संधींची गवाक्षे' हुकविणे म्हणजे भाषेच्या वेगवान वारूवर स्वार होण्यापासून मुलांना परावृत्त करणे होय.

वयाच्या सहा-आठ वर्षांपर्यंत 'अनुभव' हेच मुलांच्या मेंदूचे खाद्य असते. या वयात, मुलांच्या भोवतालच्या वातावरणात शक्यतो सर्व अनुभव देणे आणि अधिक अनुभवांसाठी जाणीवपूर्वक दैनंदिन ओळखीच्या वातावरणाबाहेर पडून नवनवे अनुभव देणे हे प्रौढांचे कर्तव्य असते. भाषेचे अनुभव म्हणून काही वेगळे अनुभव नसतात. वातावरणातील (आणि त्याबाहेरीलही) अनुभवांना भाषिक रूप देणे म्हणजेच भाषानुभव होय. दैनंदिन जीवनातील असंख्य पाहिलेल्या, ऐकलेल्या घटनांची भाषिक अभिव्यक्ती मुले आपणहून करीतच असतात. त्याला अधिक वाव देणे, अशा भाषा-भिव्यक्तीच्या नव्या संधी उपलब्ध करून देणे हे भाषाविकासाचे आवश्यक अंग आहे.

मुले अनुभवांच्या आधारे आपले भाषाज्ञान, आपले आपणच घडवीत असतात. व्याकरणशुद्ध नि अर्थपूर्ण वाक्यरचनांच्या निर्मितीचे आणि त्यांच्या हेतूपूर्ण वापराचे काम मुले दोन प्रकारे करीत असतात : एक प्रत्यक्षपणे, म्हणजे प्रत्यक्षपणे वस्तू हाताळून किंवा व्यक्तींच्या संपर्कात येऊन किंवा घटना अनुभवून (उदा० खूप पाऊस, स्वच्छ ऊन, ठार अंधार, भक्क उजेड इत्यादी). अशा प्रत्यक्ष अनुभवांतूनच त्यांच्या यांविषयींच्या संकल्पना स्पष्ट होत असतात; त्यांचे रूप मनात ठसत असते. पियाजे याला 'स्किमा' असे म्हणतो. यांमध्ये वस्तू-व्यक्ती-घटनांचे स्वत:शी आणि परस्परांशी असलेले संबंध मनात कोरले जातात. असे विविध ज्ञानेंद्रियांकरवी आणि कर्मेंद्रियांकरवी म्हणजे स्पर्शाने, वासाने, पाहण्याने, ऐकण्याने, चवीने आणि हाताळण्याने घेतलेले अनुभव मेंदूमध्ये चिरकाल टिकतात. भाषाभिव्यक्तीसाठी ते केव्हाही आमंत्रित करता येतात.

अनुभवांच्या आधारे भाषाज्ञानवृद्धी आणखी एका प्रकारे करता येते. ते म्हणजे कल्पनेच्या पातळीवरून. एखादी गोष्ट, एखादी संकल्पना किंवा कृती, यांचीही दृश्य अशी मानसप्रतिमा मुले तयार करतात. लहान मुलांना जेव्हा आपण (प्रत्यक्ष प्राणी न दाखवता) त्यांच्या गोष्टी ऐकवतो किंवा चित्रांमधून दर्शवितो तेव्हा त्यांचीही विशिष्ट प्रतिमा मेंदूमध्ये तयार केली जाते. कित्येकदा एखाद्या गोष्टीचे शाब्दिक वर्णन करूनही हे साध्य करता येते. उदाहरणार्थ, पुस्तकांतून गोष्टी, कवितांमधून आलेल्या वस्तू-व्यक्ती-घटनांच्याही मानसप्रतिमा मुले बनवत असतात. या प्रतिमांकित ज्ञाननिर्मितीचे वैशिष्ट्य मात्र असे दिसते की या सर्व प्रतिमा विशिष्ट भाषेशी आणि त्या भाषेमागील विशिष्ट संस्कृतीशी बांधलेल्या असतात; आणि ही भाषा मुलाची पहिली आत्मसात





अनुक्रमणिका

केलेली घरची भाषा असते. उदाहरणार्थ, 'आजी', 'भाकरी', 'शेत', 'नदी' या आणि अशा अनंत प्रतिमा या मुलांच्या भाषिक नि भौगोलिक परिसराशी संबद्ध अशा असतात; आणि तशाच त्या कायम राहतात.

या मानसप्रतिमा नवनव्या नि वाढत्या अनुभवांच्या आधारे सुधारल्या जातात. मानसप्रतिमा जेव्हा अधिक बारकाव्यांनी समृद्ध होते तेव्हा त्याला पियाजेने सामिलीकरण (ॲसिमिलेशन) असे म्हटले आहे. जेव्हा जुन्या प्रतिमेबरोबर न जुळणारी नवी प्रतिमा, नव्या अनुभवामुळे तयार होते, तेव्हा तिचे एक स्वतंत्र स्थान मनात निर्माण होते. पियाजेने या प्रक्रियेला व्यवस्थापन (ॲकॉमोडेशन) असे म्हटले आहे. उदाहरणार्थ, अडीच वर्षाच्या तनिष्काला दोन आजोबांचा गोंधळ उलगडत नव्हता. दादरला असणारे तिच्या आईचे वडील आले की 'आजोबा आले' असे तिच्या घरचे तिला सांगायचे आणि पुण्याला असणारे तिच्या वडिलांचे वडील आले की तेही 'आजोबा'च असायचे. काही महिन्यांनी हा गोंधळ तिचा तिलाच उलगडला. तिने पुण्याहून आलेल्या आजोबाला ठणकावून सांगितले, ''तू न पुण्याचा आजोबा ! ते न दादरचे आजोबा !'' आता तिच्या मनात दोन आजोबांच्या दोन प्रतिमा वर्गीकरणाने तयार झाल्या. आणखी काही महिन्यांनी तिची तिनेच आपल्या प्रतिमांकित ज्ञानात अजून काही भर घातली. तिने पुण्याच्या आजोबांना ठामपणे सांगितले की, ''तू माझ्या बाबांचा बाबा ! ते नं माझ्या आईचे बाबा !'' आता आजोबा या प्रतिमेचे विस्तारीत रूप तिच्या लक्षात आले. त्याचे वर्गीकरणही तिला करता आले. पुढे तर, 'आपल्याला जसे आजोबा असतात तसेच इतरांनाही असतात,' हेही तिच्या लक्षात आले. आता 'आजोबा' ही प्रतिमा केवळ व्यक्तिविशिष्ट राहिली नाही तर ती सर्वसामान्य झाली.

अर्थातच हे सर्व अनुभवांचे प्रतिमांत झालेले रूपांतर ही ज्ञानाच्या नाण्याची बौद्धिक बाजू झाली. दुसरी बाजू आहे ती भाषिक ज्ञानाची. कल्पनेच्या म्हणजे मानसिक स्तरावर प्रतिमा निर्माण होणे ही एक बाजू आहे, आणि तिचे भाषिक अंगाने वर्णन करणे, ते करण्यासाठी लागणारी शब्दसंपत्ती वाढवत जाणे, त्यांच्या साहाय्याने वाक्यरचना करीत जाणे, ही अर्थातच दुसरी बाजू आहे. समजलेल्या संकल्पना भाषेकरवी मांडता येणे आणि भाषेकरवीच संकल्पना करता येणे ही भाषाज्ञानाची अत्युच्च पातळी आहे. भाषाविकास आणि बौद्धिक विकास हा इथे हातात हात घालून जात असतो. त्याला जोड लागते ती प्रौढांनी जाणीवपूर्वक केलेल्या मेंदूआधारित अशा भाषाशिक्षणाच्या प्रयत्नांची.

संदर्भ :

**एडेल, अब्राहमसेन.** १९९८. ''कॉग्निटिव्ह अँड लिंग्विस्टिक डेव्हलपमेंट,'' *अ कम्पॅनिअन टु कॉग्निटिव्ह सायन्स* (संपादन, विल्यम बेकटेल, जॉर्ज ग्रॅहॅम). ब्लॅकवेल पब्लिशिंग, ऑस्ट्रेलिया.

**ओट्टो, बेव्हरली.** २००२. *लँग्वेज डेव्हलपमेंट इन अर्ली चाइल्डहुड.* मेरील प्रिंटीस हॉल, न्यू जर्सी.

**केविन, विल्यम आणि जॉर्ज ओजेमन.** १९९४. *कॉन्व्हर्सेशन विथ निल्स ब्रेन : द नेचर ऑफ थॉट अँड लॅग्वेज.* ॲडिसन-वेल्से पब्लिशिंग कंपनी, न्यू इंग्लंड.

**चॉम्स्की, नोअम.** १९६९. ''लॅग्वेज ॲड द माईंड''. *सायकॉलॉजी टुडे.* ('कान्व्हर्सेशन विथ निल्स ब्रेन'वरून उद्धृत) फेब्रुवारी.

**डिकॉन, टेरीन्स.** २००४. "लिंग्विस्टिक थिअरी'', *अ कम्पॅनिअन टु कॉग्निटिव्ह सायन्स.* (संपादक : विल्यम बेकटेल, आणि जॉर्ज ग्रॅहॅम) ब्लॅकवेल पब्लिशिंग, ऑस्ट्रेलिया.

**पिंकर, स्टिव्हन.** १९९४. *'द लॅग्वेज इन्स्टिंक्ट : हाऊ द माइंड क्रिएटस लँग्वेज'.* हार्पर पेरेनिअल, न्यूयॉर्क.

**बॉक, कॅथरिन आणि सुझन गार्नसी.** २००४. ''लँग्वेज प्रोसेसिंग'' *अ कम्पॅनिअन टु कॉग्निटिव्ह सायन्स* (संपा. विल्यम बेकटेल आणि जॉर्ज ग्रॅहॅम). ब्लॅकवेल पब्लिशिंग, ऑस्ट्रेलिया.

**ब्रुनर, जेरोम.** १९८३. *चाईल्डस् टॉक : लर्निंग टु युझ लॅग्वेज.* डब्लू. डब्लू. नॉर्टन ॲन्ड कं. न्यूयॉर्क.

**ब्रॅण्डी, सायमन.** 'टुल्सा एज्युकेशन एज्युकेट्स...' दि न्यूयॉर्क टाइम्स. ०७-१२-२००६.

**वर्डस्वर्थ, बॅरी.** १९७१. *पियाजेज थिअरी ऑफ कॉग्निटिव्ह डेव्हलपमेंट.* लाँगमन, -- यू.एस.ए.

**वायगोटस्की, लेव्ह.** १९६२. *थॉट अँड लॅग्वेज* (भाषांतर : हाफमन युजीन, गर्ड्रयुड वॅकर). एम.आय.टी.प्रेस, यू.एस.ए.

**वायगोटस्की, लेव्ह.** १९७८. *माइंड इन सोसायटी : दि डेव्हलपमेंट ऑफ हायर मेंटल सायकॉलॉजिकल प्रोसेस.* हार्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, यू.एस.ए.

**सेगन, कार्ल.** १९७१. *ब्रोकाज ब्रेन.* बॅलंटिन पब्लिशिंग ग्रुप, यू.एस.ए.

■

भ्रमणभाष : 9881230869. panse-r@hotmail.com



अनुक्रमणिका








# कर्नाटकामधील भाषावैज्ञानिक अभ्यास

**एस.एस. यदुराजन**
भाषांतर : **विजय पाध्ये**

**१.० प्रारंभ**

कन्नडमधील भाषावैज्ञानिक अभ्यासाचा प्रारंभ विसाव्या शतकाच्या सुरुवातीला झाला असला तरी श्रीविजयचे *कविराजमार्ग* (इ.स. ८५०) **केसीराज** यांचे *'शब्दमणिदर्पण'*, **नागवर्मा** यांचे *'छंदूमबुधी'*, **भट्टकलंक** यांचे *'छंदोनुशासन'* आणि इतर रचना अगदी सुरुवातीच्या व्याकरणाच्या अभ्यासात आढळतात. या रचनांमध्ये 'पुलीगेरेय तीरुळगन्नडा' (म्हणजे पुलीगेरे या ठिकाणचे शुद्ध कन्नड), 'दक्षिणोत्तर मार्ग' (म्हणजे दाक्षिणात्य आणि उत्तरेकडील कन्नड भाषाशैली), आणि कन्नडानगल (म्हणजे कन्नडची विविधता) असे उल्लेख आढळतात. या कृतींतून लिखित कन्नडच्या रचनेचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला असला तरी त्या वेळी प्रचलित असलेल्या बोलीभाषेच्या विविधतेबद्दल काही ठिकाणी सविस्तर लेखन आढळून येते. परंतु याबद्दलची निरीक्षणे आणि भाषा-परिचयासाठीच्या नोंदी या काही प्रमाणात - असे करा आणि तसे करू नका अशा आदेशपद्धतीच्या - नियमावलीच्या स्वरूपात आहेत. त्याबरोबरच कन्नड व्याकरणाविषयीच्या अशा बहुतेक विचारप्रणाली या पारंपरिक संस्कृतमधून उमलल्या आहेत. याचे कारण असे की पूर्वीचे व्याकरणतज्ज्ञ हे संस्कृत आणि कन्नड अशा दोन्ही व्याकरण-परंपरांमध्ये पारंगत होते. त्यामुळे त्यांनी भाषाविज्ञानविषयक माहिती संस्कृत परंपरेच्या माध्यमातून देण्याचा प्रयत्न केला. यामुळे कन्नड भाषेच्या विकासाला हानी पोहोचते; एवढेच नव्हे तर भाषेचा वापर वस्तुनिष्ठतेपासून फार दूर राहतो असे काही आधुनिक भाषावैज्ञानिकांना वाटते. अशाच प्रकारे बोली भाषेतील वैविध्य नोंदविणारे आणि सादृश्य, स्वन व वर्णव्यवस्था, संधी, समास, वैकल्पिक पर्यायलब्धी इत्यादी विविध भाषाप्रकारांचे नियम स्पष्ट करणारे केसीराज हे भाषिक प्रक्रियांचे बहुधा एकमेव व्याकरणतज्ज्ञ होते. कन्नड प्रांतात उदयाला आलेली भाषाविज्ञानाचा हा सर्वात पुरातन विचार असल्याचे आपल्याला मानता येईल. काही ठिकाणी कन्नड आणि संस्कृतच्या मिलाफाची तेल आणि तुपाच्या मिश्रणाशी तुलना केल्याचे दाखले आपल्याला (नयसेन) पाहायला मिळतात. या दोन भाषांच्या अभिसरणाविषयीच्या अंदप्या यांच्या

(अंदय्या यांनी 'कब्बीगर काव' नावाचे पुस्तक एकही संस्कृत शब्द न वापरता त्यावेळच्या कन्नडमध्ये यशस्वीपणे लिहिले होते) प्रगत विचारसरणीचा त्या वेळी पंडितांनी उपहास केला होता.

हे काही प्रयत्न सोडले तर कन्नड भाषाविज्ञानाच्या अभ्यासाला काही शतके गती मिळाली नव्हती. आधुनिक भाषाविज्ञानाच्या तत्त्वांनुसार कन्नड भाषेचे वर्णन आणि पृथक्करण करण्याच्या कार्याला विसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात गंभीरपणे सुरुवात झाली. मध्यंतरीच्या काळात अशाप्रकारचे काही प्रयत्न झाले. श्रीरंगपट्टणाच्या **कृष्णामाचार्य** यांचे *'होसगन्नडा नुडीगन्नडी'* (१८८२), **डी.एन्. मुलबगल** यांचे *'नुडीगट्टू'* (१८९२), **बी. मल्लप्पा** यांचे *'शब्दादर्श'* (१९१८, दुसरी आवृत्ती), **एम्.पी. पुजार** यांचे *'नुडीगन्नडी'* (१९२९) आणि **श्रीनिवास राघवाचार्य** आणि **कृष्णप्पा** यांचे *'हळगन्नडा व्याकरण'* (कन्नडा कैपिडी-भाग १ (१९२७) असे काही प्रयत्न दखल घेण्याजोगे आहेत. याच कालावधीत रेव्ह. **किटल** ('ग्रामर ऑफ कन्नड लँग्वेज इन इंग्लिश कंप्रायझिंग थ्री डायलेक्ट्स ऑफ दि लँग्वेज : एन्शंट, मेडिव्हल अँड मॉडर्न', १९०३), **कॅरे** ('ग्रामर ऑफ कन्नड लँग्वेज', १८१७), **झिग्लर** ('प्रॅक्टिकल की टु कन्नड लँग्वेज', १८५३ आणि 'कन्नड शाला व्याकरण', १८६६), ग्रिअर्सन ('कॅनरीज ग्रामर', १९०६) आणि इतर युरोपियन विद्वानांनी भाषेच्या विकासाला अत्यंत मोलाचा हातभार लावला. साधारण याच कालावधीत **ए.एन्. नरसिंहैया** यांचे *'ए ग्रामर ऑफ दि ओल्डेस्ट कॅनरीज इन्स्क्रिप्शन्स'* आणि **जी. एस्. गई** यांचे *'हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ ओल्ड कन्नड'* ही दोन पुस्तकेही प्रकाशित झाली होती. त्यांना त्या संपूर्ण कालखंडाचे नेतृत्व करणाऱ्या कृती असे संबोधता येईल. **आर्.व्ही. जागिरदार** यांचे *'शारदेय संसार'* (१९३३), **शी.चे. नंदीमठ** यांचे *'भाषाभ्यास'* आणि **शाम. बा. जोशी** यांचे *'कण्मरेयाद कन्नड'* (१९३४), *'कन्नडीया हुट्टु'* (१९३७), आणि *'कन्नडादे नेले'* (१९३९) अशा प्रयत्नांचे महत्त्व देखील गौण लेखून चालणार नाही. प्रा. टी.एन्. श्रीकांतैया यांची अमेरिका-भेट आणि १९६० मधील पुण्यातील समर इन्स्टिटयूट ऑफ लिंग्विस्टिक्समुळे या कार्याला आवश्यक ती चालना मिळाली. रॉकफेलर फाउंडेशनच्या साहाय्यामुळे काही कन्नड विद्वान अमेरिकेला भेट देऊ शकले आणि तेथे त्यांनी आधुनिक भाषाविज्ञानाचे प्रशिक्षण घेतले. विशेषतः प्रा. टी. एन्. श्रीकांतैया यांच्या १९५५-५६च्या अमेरिका-भेटीमुळे कन्नड भाषातज्ज्ञांसाठी नवे दालन खुले झाले. तिथे त्यांनी भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात जे काही शिक्षण घेतले त्यातील सर्व तत्त्वे त्यांनी कन्नड भाषेला लावली आणि त्यामुळे संशोधकांसाठी नवी दालने खुली झाली. याचवेळी म्हणजे १९४० मध्ये 'बुलेटिन ऑफ फोनेटिक स्टडीज्'ची सुरुवात

झाल्यामुळे भाषेच्या नकाशावर मैसूरचेही नाव झळकले. १९३५मध्ये मैसूर ओरिएण्टल कॉन्फरन्समध्ये ती. नाम. श्रीकान्तैया यांचा 'दि म्युटेशन ऑफ आय्, यू, इ ॲण्ड ओ इन कन्नड' हा निबंध सादर केला गेला. याला कन्नड भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातील पहिला लेख असे म्हणता येईल. आपल्या भाषाज्ञानाला बळकटी देतानाच *'इंग्लिश ॲज दि कन्नडिगा स्पीक्स इट'* या लेखात त्यांनी कन्नड लोकांच्या इंग्लिश बोलण्याचे चित्र देखील रेखाटले. 'आफ्रिकेटस् इन कन्नड स्पीच' (इंडियन लिंग्विस्टिक्स, खंड १४, १९५४) या त्यांच्या लेखामुळे अनेक कन्नड भाषक प्रभावित झाले. आतापर्यंत बहुतेक कन्नड व्याकरण हे संस्कृत भाषेवर आधारित असल्यामुळे वर्गवारी केलेल्या व्यंजनांच्या दुसऱ्या मालिकेतील च, छ, ज आणि झ ही तालव्य व्यंजने रोधक (स्टॉप्स) मानली जात होती. पूर्वीच्या व्याकरणतज्ज्ञांच्या या व्यंजनांना रोधक म्हणण्याबद्दल त्यांनी प्रश्न उपस्थित केला आणि कन्नड बोलीतील अनेक उदाहरणांचे दाखले देऊन ही व्यंजने रोधक नसून घर्षस्फोटक रोधक आहेत असे सिद्ध केले. विशेषत: उत्तर कर्नाटकात हे ध्वनी तालव्यरोधक नव्हे, तर जिव्हाग्रदंत्य स्वरूपात उच्चारले जातात; असे जेव्हा ते प्रतिपादन करतात तेव्हा त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा प्रत्यय येतो. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे हा बदल मराठी आणि तेलुगुच्या प्रभावामुळे घडला आहे. 'कर्णाटक' (काही संस्कृत लेख आणि व्याकरणात सांगितल्याप्रमाणे) ऐवजी 'कर्नाटका' या शब्दाला का पसंती मिळते याबद्दलचे त्यांचे स्पष्टीकरण अप्रतिम आहे. १९३४मध्ये प्रकाशित झालेले शालेय व्याकरणाचे 'कन्नड माध्यम व्याकरण' या त्यांच्या पुस्तकामुळे भाषेच्या अभ्यासाला एक नवीन आयाम प्राप्त झाला आहे. आजतागायत या पुस्तकाला व्याकरणातील सर्वोत्कृष्ट पुस्तकांपैकी एक असे मानण्यात येते. *'भाषेगळु कर्नाटकादल्ली'* (१९७०), *'कट्टन मटु बेदंदे'* (१९६३), *'कर्नाटक एंबा रुप साधुवी ?'* (१९५८), *'कन्नड इगिना व्याप्ती'* (१९३५), *'लँग्वेजिज् ऑफ कर्नाटक'* (१९६८), *'स्मालूकन'* (१९५८), *'दि कन्नड लँग्वेज थ्रू दि एजेस'* (१९५५), *'गोम्मत शब्दद निष्पत्ती'* (१९५८) ही त्यांची इतर काही पुस्तके आहेत. याच काळात प्रकाशित झालेले **ए. एन्. नरसिंहैया** यांचे *'कन्नड प्रथम व्याकरण'* हे पुस्तक देखील महत्त्वपूर्ण आहे. **रॉबर्ट काल्डवेल** यांच्या *'ए कंपॅरिटिव्ह ग्रामर ऑफ द्राविडियन ऑर साउथ इंडियन फॅमिली ऑफ लँग्वेजिज्'* (१९५४) या पुस्तकात त्यांनी सर्व द्राविडी भाषांचा अभ्यास करून त्यांची दक्षिण द्राविडी, मध्य द्राविडी व उत्तर द्राविडी अशी वर्गवारी केली. त्यामुळे या भाषांच्या सखोल अभ्यासाला चालना मिळाली. कालांतराने या वर्गीकरणात आणि विश्लेषणात संशोधकांनी काही त्रुटी दाखविल्या तरीही केवळ शब्दांची तुलना न करता भाषेच्या

संरचनेवर भर देण्याची त्यांची पद्धत खरोखरच वाखणण्याजोगी आहे.

**२.० नामवंत विद्वान आणि कन्नड भाषाविज्ञानातील त्यांचे योगदान**

ती. नाम. श्रीकान्तैया यांनी आपल्या स्वनविज्ञान, शब्दभांडार आणि व्याकरण या क्षेत्रातील संशोधनामुळे असंख्य कन्नड विद्वानांना भाषाविज्ञानाकडे वळवले. १९६०च्या समर इन्स्टिट्यूट इन लिंग्विस्टिक्समुळे या कामाला उत्तेजन मिळाले. प्रा. श्रीकान्तैया यांच्या बरोबरीने प्रा. एच्. एम. नायक, प्रा. आर्. सी. हिरेमठ, प्रा. चिदानंद मूर्ती यांनाही १९६०च्या अखेरीस अमेरिकेला जाण्याचा मान मिळाला. या सर्व विद्वानांनी कन्नड भाषाविज्ञानाचाच नव्हे; तर कर्नाटक राज्यातील भाषाविज्ञानाचा अभ्यास करून कन्नड भाषेच्या अनेक अंगांचा शोध घेतला. याच कालावधीत लिखित कन्नड भाषा आणि मौखिक भाषा यांमधील फरक दाखविणारे वर्णनात्मक अभ्यास प्रसिद्ध झाले. त्या वेळी मैसूर आणि कर्नाटक विद्यापीठांतील कन्नड विभाग हे या कार्याचे प्रमुख केंद्र बनले होते. वस्तुस्थिती अशी आहे की, पदवी आणि पदव्युत्तर पातळीवर भाषाविज्ञान या विषयाची सुरुवात करणारी ही पहिली विद्यापीठे आहेत. पारंपरिक व्याकरण-परंपरेतील अनेक विद्वानांनीही कन्नड भाषाविज्ञानाच्या विकासाला आपले योगदान दिले आहे. **डी.एल्. नरसिंहाचर** (*'शब्दविहार', 'कन्नडदल्ली शब्दरचने'*), **सेदीयपु कृष्ण भट** (*'कन्नड वरणगळु'*, १९५४, *'केलवु दीशानामगळु'*, १९७५, *'तथ्यदर्शन'*, १९९१), **डॉ. के.जी. शास्त्री** (*'दि हव्यक डायलेक्ट ऑफ नॉर्थ कॅनरा'*, १९७१ आणि 'दि सर्व्हे ऑफ उत्तर कन्नड डायलेक्ट्स, दि प्रोसेस ऑफ मॉडर्नायझेशन इन कन्नड लँग्वेज') यांसारखे लेख ही यापैकी काही प्रसिद्ध विद्वानांची महत्त्वाची लेखनकार्ये आहेत. या विद्वानांनी भाषाविज्ञानाचे औपचारिक प्रशिक्षण घेतले नसले तरीही आधुनिक भाषाविकासाचा त्यांनी परिचय करून घेतला. त्यांचे अभ्यासाचे विषय म्हणजे शब्दसंग्रह व व्युत्पत्ती. या क्षेत्रांत त्यांनी मौलिक मर्मदृष्टीची भर घातल्याचे दिसून येते.

साठच्या दशकाची अखेर आणि सत्तरच्या दशकाची सुरुवात हा काळ कन्नड भाषाविज्ञानाच्या दृष्टीने सुवर्णकाळ होता. ती. नाम. श्रीकान्तैया, विल्यम ब्राईट, एम्. बी. एमिनो आणि इतरांकडून प्रशिक्षण घेतलेल्या अनेक विद्वानांनी भाषाविज्ञानाचा स्वीकार केला. एच्.एम्. नायक (*'कन्नड लिटररी अँड कलोक्वियल - ए स्टडी ऑफ टु स्टाइल्स'*, १९६७, *'को-एक्झिस्टंट फनिमिक सिस्टिम अँड अॅन ओल्ड कन्नडा ग्रामर'*, १९६५, **एच्.एस्. बिलिगिरी** (*'आलूक'*, १९६९, *'वर्णनात्मक व्याकरण'* १९७०, आणि *'वरसेगळु'*, १९९५, *'कन्नड व्हर्ब्ज : टू मॉडेल्स'*, १९५९), **आर्. सी. हिरेमठ** (*'दि स्ट्रक्चर ऑफ कन्नड'*, १९६१), **डॉ. चिदानंद मूर्ती** (*'भाषाविज्ञानाद*

*मूलतत्त्वगळु'* १९७१), **डॉ. डी.एन्. शंकर भट** (*'डिस्क्रिप्टिव्ह अ‍ॅनॅलिसिस ऑफ तुळु, ग्रमॅटिकल रिलेशन्स इन इंडियन लँग्वेजिज्, कोरगु लँग्वेज', 'ऑनॅलाईन ग्रामर ऑफ हव्यक, साउंड चेंज'*, १९७२, *'कन्नड वाक्यगळु मत्तु अर्थव्यवस्थे कन्नड शब्द रचने'*, १९९९, *'दि प्रॉमिनन्स ऑफ टेन्स', 'मूड अँड आस्पेक्ट'*, १९९९, *'कन्नड सर्वनामगळु'*, २००३, *'कन्नडके बीकु कन्नडदी व्याकरण'*, २०००, *'कन्नड बरहावन्नु सरीपाडीसून'*, २००५, *'निजकु हलेकगन्नड व्याकरण एंतहुदु'*, २००५, *'कन्नड पदगल ओलरचने'*, १९९९, *'कन्नड वाक्यगल ओलरचने'*, २००४, *'भाषेय बेगेगे नीवीनु बल्लिरि ?'*, १९७०, *'कन्नड सर्वनामगळु'*, २००३) हे त्यांपैकी काही विद्वान होत. या विद्वानांनी कन्नड भाषाविज्ञानाच्या विकासाचा भक्कम पाया रचला. डी.एल्. नरसिंहाचर, सेदीयपु कृष्ण भट, जी. वेंकटसुबैय्या, एल्.एस्. शेषगिरी राव, एम्. मारियप्पा भट, के.जी. शास्त्री, एच्. एस्. अनंतनारायण, बी. रामचंद्र राव, वेंकटचल शास्त्री, हंपा नागराजैया, एम्.एम्. कलबुर्गी अशा अनेक साहित्यिकांनी जडणघडणीच्या काळात कन्नड भाषेतील पुस्तके व लेखांद्वारे कन्नड भाषाविज्ञानात मोठी भर घातली. यांपैकी अनेकांनी भाषाविज्ञानाचे औपचारिक प्रशिक्षण घेतले नसले तरीही त्यांच्या मनाचा कल भाषाभ्यासाकडे होता आणि आपल्या ज्ञानाचा उपयोग करून लोककथा, छंदशास्त्र, व्याकरण, बोलींचा अभ्यास, शब्दकोशशास्त्र, इत्यादी कन्नड भाषाक्षेत्रांत संशोधन केले.

**रेव्ह. जी. एफ्. किटल** (*'स्कूल डिक्शनरी'*, इंग्लिश - कन्नड, १८७६, *'ए कन्नड-इंग्लिश डिक्शनरी'*, १८९४, *'ए कन्नड-इंग्लिश डिक्शनरी'*, १८९९). **एच्. स्पेन्सर** (*'ए कन्नड ग्रामर विथ ग्रॅज्युएटेड एक्झरसाइझेस'*, १९१४, *'ए कॅनरीज ग्रामर'*, १९१४, *'ए कॅनरीज ग्रामर'* (रिव्हाइज्ड), १९५०), **जे. ब्लॉच** (*'रिव्ह्यू ऑफ जी. एस्. गईज् हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ ओल्ड कन्नड'*, १९४६, *'रिव्ह्यू ऑफ ए.एन्. नरसिंहाज् ए ग्रामर ऑफ दि ओल्ड कन्नड इन्स्क्रिप्शन्स'*, १९४६), डब्ल्यू. ब्राईट (लँग्वेज, सोशल स्ट्रॅटिफिकेशन अँड कॉग्निटिव्ह ओरिएंटेशन, एक्स्प्लोरेशनस् इन सोशिओ - लिंग्विस्टिक्स), १९६६, *'अ‍ॅन आउटलाइन ऑफ कलोक्वियल कन्नड'*, १९५८, *'मैसुरु कन्नड सामाजिक प्रभीधगलु'*, १९६३, *'लिंग्विस्टिक चेंज इन सम इंडियन कास्ट डायलेक्ट्स '* (डेटा फ्रॉम कन्नड लँग्वेज), १९६०, *'ए स्टडी ऑफ कास्ट अँड डायलेक्ट्स इन् मैसूर'*, १९६०, *'दि द्राविडियन स्क्रिप्टस्'*, १९९८, *'कन्नड अँड तेलुगु रायटिंग'*, १९९६, *'दि एनन्शिएटिव्ह व्हॉवेल'*, १९७२, *'फोनॉलॉजिकल रूल्स इन लिटररी अँड कलोक्वियल कन्नड'*, १९७०) **टी. बरो** (*'रिव्हयू ऑफ ए. एन्. नरसिंहैयाज् ए ग्रामर ऑफ द ओल्ड कन्नड'*, १९४६, **जी.एस्. गई** यांच्या

*'हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ ओल्ड कन्नड'*ची समीक्षा, १९४६) **डब्ल्यू. कॅरे** (*'ए ग्रामर ऑफ दि कर्नाटिका लँग्वेज'*, १८१७), **जी. केली** (विल्यम ब्राइट यांच्या *'ॲन आउटलाइन ऑफ कलोक्वियल कन्नड'*ची समीक्षा, १९५८), **एम.एस्. अँड्रोनव्ह** (*'जाझयक कन्नड'*, १९६२, *'दि कन्नड लँग्वेज'*, १९६९), **एच्. शिफमन** (*'कन्नड इन इंटरनॅशनल एन्सायक्लोपेडिया ऑफ लिंग्विस्टिक्स्'*, खंड २, **विल्यम ब्राइट**, १९९२, *'ए रेफरन्स ग्रामर ऑफ स्पोकन कन्नड'*, १९७६, *'मॉर्फोफनिमिक्स इन कन्नड'*, १९६५, **हेलन इ. उलरीच** (*'ए प्रोफाइल ऑफ मल्टीलिंग्वॅलिझम इन बँगलोर : लँग्वेज यूसेज इन साऊथ इंडिया कॅपिटल'*, १९७९, *'रुरल अँड अर्बन मल्टीलिंग्वॅलिझम : ए साउथ इंडियन केस'*, १९८२, *'सोशिओ-लिंग्विस्टिक चेंज इन लँग्वेज ॲटिट्यूडस् : ए कर्नाटक व्हिलेज'*, १९९२, *'सब्जेक्टिव्ह एक्स्पीरियन्सेस इन हव्यक कन्नड'*, १९८८), **विल्यम मॅकॉरमॅक** (*'कन्नड - एक कल्चरल ट्रॅडिशन टु द स्पोकन स्टाइल्स ऑफ द लँग्वेज'*, १९६६), **सी. कँपबेल** (*'एलिमेंटस् ऑफ कॅनरीज ग्रामर'*, १८९३), **डब्ल्यू. रीव** (*'डिक्शनरी : कन्नड-इंग्लिश'*, २ खंड, १८२४) अशा अनेक पाश्चिमात्य विद्वानांनी कन्नड भाषाविज्ञानाच्या विकासासाठी योगदान दिले आहे.

कन्नड भाषाविज्ञानाच्या शैक्षणिक आणि संशोधनकार्यामध्ये सत्तर आणि ऐंशीच्या दशकात अचानक वाढ झाल्याचे आढळते. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयात आणि दिल्ली विद्यापीठात भाषाविज्ञान हा विषय स्वतंत्रपणे शिकवायला सुरुवात करण्यात आली. धारवाडचे कर्नाटक विद्यापीठ (१९६७) आणि मैसूरचे मैसूर विद्यापीठ (१९७२) येथे भाषाविज्ञान विभाग स्थापन करण्यात आले. यामुळे शैक्षणिक आणि संशोधन कार्याला आवश्यक ती गती मिळाली. **बी.बी. राजपुरोहित** (*'ए ग्रामर ऑफ वचन लिटरेचर'*, १९६३, *'इंटेन्सिव्ह कोर्स इन कन्नड'* १९७५, *'पेपर्स इन फनेटिक्स अँड फोनोलॉजी'*, १९८४, *'ॲकुस्टिक स्टडीज इन इंडियन लँग्वेजेस्'*, १९८६, *'ॲकुस्टिक कॅरॅक्टरिस्टिक्स ऑफ कन्नड'* १९८२, *'बेंद्रेयवर काव्यभाषे'*, १९९८, *'कन्नड-कन्नड-जॅपनीज डिक्शनरी'*, 'लिंग्विस्टिक स्टडीज इन कन्नड', १९९३) **विल्यम माडथा** (*'कन्नड भाषेय रूपरीशेगळु'*, १९७५, *'कन्नड भाषे'* [एम्. एस्. अँड्रोनोव्ह यांच्या *'दि कन्नड लँग्वेज'*चे भाषांतर] १९७७, जानपद भाषाविज्ञान, १९८७) **के. व्ही. नारायणा** (*'भाषेय सुत्तमुत्त'*, १९९८, *'बीरू, काणडा, सीगुरू'*, १९९७, *'मत्ते भाषेय सुत्तमुत्त'*, २००१, *'द्विभाषिकते'*, १९९८, *'भाषे विश्वकोश'*, २०००) **संगमेष सवदत्तीमत** (*'द्राविड भाषेगळु'*, १९७४, *'द्राविड भाषाव्यासंग'*, १९७६, *'हरिहराज् रगळे : ए लिंग्विस्टिक ॲनॅलिसिस'*, १९८५, *'द्राविड भाषा परिचय'*, १९८५, *'कलबुर्गी कन्नड'*, १९८९, *'कन्नड भाषाप्रभेदगळु'*, १९९८, *'कन्नड भाषा कैपिडी'*, १९९१, *'कन्नड*

*भाषा संपदा'*, १९९४, *'भाषालिख'*, १९९९, *'आर्य भाषा व्यासंग'*, २०००, *'तौलनिक भाषाविज्ञान'*, २००१, *'कन्नड भाषेय स्वरूप'*, २००२, **के. केम्पेगौडा** (भाषाविज्ञान कोश, १९७६, सामान्य भाषाविज्ञान, १९९३, १९९६, *'भाषा वर्गीकरण'*, १९८०, *'तौलनिक भाषाविज्ञान'*, १९९६, *'कन्नड भाषा चरित्रे'*, १९९४, *'कन्नड भाषा स्वरूप'*, १९९७, *'कन्नड उपभाषेगळ अध्ययन'*, २००२, **जे.एस्. कली** (*'केसीराजाज् शब्दमणिदर्पण'*, *'ए लिंग्विस्टिक ॲनॅलिसिस'* १९७१, *'वर्णनात्मक भाषाविज्ञान'*, १९७१, *'ऐतिहासिक भाषाविज्ञान'*, १९७७, भाषासौध), **कृष्ण परमेश्वर भट्ट** (*'कन्नड-तेलुगु द्विभाषिकतेय अध्ययन'*, १९९५, *'कन्नड : रचने मत्तु बाळके'*, २००२, *'भाषे मत्तु संस्कृती'*, १९८०, *'हव्यक कन्नडदल्ली अनिनासिकीकरण, काव्यभाषे इन साधने'*, खंड ३, *'श्रीयवर भाषाप्रयोगगळुस'* **जी.एस्. शिवरुद्रप्पा,** *'मास्तीयवर कटेगळ भाषे इन कर्नाटक लोचन'*, खंड ४.२ पर्सनल नेम्स इन नाईक्स, १९७२, *'दि लँग्वेज् ऑफ पोएट्री'*, १९७६, *'कन्नड फोनॉलॉजी'.*)

**के. कुशलप्पा गौडा** (*'दि अदर साइड ऑफ कंपॅरेटिव्ह द्राविडियन'*, १९७२, *'ए ग्रामर ऑफ कन्नड बेस्ड ऑन द इन्स्क्रिप्शन्स् ऑफ कूर्ग, साउथ कॅनरा अँड नॉर्थ कॅनरा डिस्ट्रिक्ट्स १००० टु १४००'*, १९७२, *'ए कोर्स इन मॉडर्न कन्नड'*, १९८३, *'कन्नड भाषे मत्तु व्याकरणगळ ओंदु अध्ययन'*, १९८७, **गौडा कन्नड,** *'द्राविडियन कास्ट सीस्टिम, कन्नड भाषावलोकन'*, १९८४, *'कन्नड, तिरुळ कन्नड मत्तु समाज'*, १९९१, *'कन्नड व्याकरण'*, १९९२, *'नाउन क्लासिफिकेशन इन कन्नड'*, *'पॅसिव्ह व्हॉइस इन कन्नड'*, *'कन्नड व्याकरण : सांप्रदायिक हागू भाषावैज्ञानिक'*) **यू.पी. उपाध्याय** (*'कन्नड फनेटिक रीडर'*, *'ए कंपॅरेटिव्ह स्टडी ऑफ कन्नड डायलेक्ट्स'*, १९७६, *'कॉन्व्हर्सेशनल कन्नड'*, *'द्राविडियन अँड निग्रो आफ्रिकन एथ्नो-लिंग्विस्टिक स्टडी'*, कोस्टल कर्नाटका, तुळु लेक्सिकॉन) आणि अशा अनेक विद्वानांनी यामध्ये अत्यंत मोलाचे योगदान दिले.

सत्तरच्या आणि ऐंशीच्या दशकांना वर्णनात्मक भाषाविज्ञानाचा कालखंड असे संबोधता येईल, तर नव्वदच्या दशकात उपयोजित भाषाविज्ञानाचे विविध पैलू अभ्यासण्यात आल्याचे दिसून येते. भाषाविज्ञानाच्या प्राथमिक अवस्थेत अमेरिकी भाषावैज्ञानिकांमुळे भाषाविषयात गोडी निर्माण झाली आणि अनेक विद्वानांनी वर्णनात्मक विश्लेषणात अमेरिकी नमुन्याचे अनुकरण केले. नंजनागुड कन्नड, बरकुर कन्नड, गुलबर्ग कन्नड, गूंडलुपेट कन्नड, हव्यक कन्नड, गौडा कन्नड आणि असे अनेक वर्णनात्मक अभ्यास निर्माण झाले. मौखिक भाषेतील विविध बदलांचा अभ्यास करण्यावर भर दिल्यामुळे भाषावैज्ञानिकांना प्रमाण कन्नडपलीकडे पाहून विविध प्रदेशांची

भाषिक वैशिष्ट्ये शोधता आली. स्वनिमिक व रूपिमिक आणि कदाचित वाक्यविन्यासाची वैशिष्ट्ये निश्चित करणे व प्रमाण कन्नडशी तुलना करणे यापुरते काही वेळा त्यांचे प्रयत्न मर्यादित राहिले. ती. नाम. श्रीकान्तैया यांचे *'माध्यम व्याकरण'* हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर भाषावैज्ञानिकांना आपले भाषाविज्ञानाचे असलेले ज्ञान भाषेच्या अध्यापनासाठी - विशेषतः कन्नडच्या अध्यापनासाठी - वापरणे शक्य झाले. परंतु अशा प्रकारचे प्रयत्न इतके अत्यल्प होते, की भाषेच्या अध्यापनाच्या पद्धतीत किंवा शैक्षणिक साहित्यात त्यामुळे काही खरा बदल घडून येणे शक्य झाले नाही. इतर भाषांमधून आलेल्या शब्दांचा अभ्यास, स्थाननामांच्या उपपत्तीविषयीचा अभ्यास, भाषेच्या शैलीचा अभ्यास, प्रशासकीय शब्दकोश निर्मिती अशा प्रकारे शब्दकोशशास्त्राशी संबंधित असे काही ग्रंथ आपल्याला आढळून येतात. या प्रयत्नांमुळे भाषाविज्ञानाचे उपयोजन भाषेच्या विविध क्षेत्रांमध्ये करण्यासाठी नवीन अभ्यासक्षेत्रे निर्माण झाली. कर्नाटक राज्यातील विद्यापीठांच्या भाषाविज्ञानाच्या वैज्ञानिक अभ्यासक्रमावर एक धावती नजर फिरवली तर भाषावैज्ञानिक अभ्यासामुळे इच्छुकांना किती विशाल संधी प्राप्त झाल्या आहेत, ते दिसून येईल.

**३.० विद्यापीठांतील भाषावैज्ञानिक अभ्यास**

मैसूर विद्यापीठ (मैसूर), बंगलोर विद्यापीठ (बंगलोर), मंगलोर विद्यापीठ (मंगलोर), कन्नड विद्यापीठ (हंपी), कुवेंपु विद्यापीठ (भद्रावती), कर्नाटक विद्यापीठ (धारवाड), गुलबर्गा विद्यापीठ (गुलबर्गा), कर्नाटक राज्य मुक्त विद्यापीठ (मैसूर), कर्नाटक महिला विद्यापीठ (विजापूर) आणि तुमकुर विद्यापीठ (तुमकुर) अशी नऊ विद्यापीठे कर्नाटक राज्यात आहेत. विश्वेश्वरैया तांत्रिक विद्यापीठ, (बेळगाव), राजीव गांधी आरोग्यविज्ञान विद्यापीठ (बेंगलोर), आणि दोन कृषि विद्यापीठे (GKVK) यांची येथे गणना होऊ शकत नाही; कारण या विद्यापीठांचा भाषा-विज्ञानाशी काहीही संबंध नाही. वर दिलेल्या नऊ विद्यापीठांपैकी फक्त मैसूर विद्यापीठ आणि धारवाडच्या कर्नाटक विद्यापीठातच भाषाविज्ञानाचा अभ्यासक्रम उपलब्ध आहे. या विद्यापीठांनी पदवीपूर्व आणि पदव्युत्तर अशा दोन्ही पातळ्यांवर स्वतंत्ररीत्या भाषाविज्ञानाची संधी उपलब्ध करून दिली आहे. बंगलोर विद्यापीठ, कन्नड विद्यापीठ, गुलबर्गा विद्यापीठ आणि मंगलोर विद्यापीठ यांमध्ये कन्नड आणि/किंवा इंग्लिश पदव्युत्तर अभ्यासक्रमांत भाषाविज्ञान हा जोड-विषय म्हणून सुरू करण्यात आला आहे. जे विद्यार्थी पदव्युत्तर अभ्यासक्रमात इंग्लिश, कन्नड आणि इतर वाङ्मयशाखा निवडतात ते भाषाविज्ञान देखील घेतात; कारण त्यामुळे त्यांच्या प्रमुख विषयाला विशेष पैलू प्राप्त होतात. हंपी येथील कन्नड विद्यापीठात भाषाविज्ञान हा विषय काही अभ्यासक्रमांतून सध्या उपविषय

म्हणून शिकविण्यात येतो.

## ४.० राज्यातील भाषाविज्ञानाची सध्याची स्थिती

सध्या राज्यातील मैसूर आणि कर्नाटक या दोन प्रमुख विद्यापीठांमध्ये भाषाविज्ञान शिकवले जाते. परंतु हा विषय एम.ए.साठी निवडता येत असल्यामुळे, त्याची आवड कमी झालेली नाही. राज्यातील भाषाविज्ञानाची जवळपास तीन दशके लक्षात घेता, आणि शेकडो विद्यार्थी पदव्युत्तर शिक्षण घेऊन बाहेर पडत असताना, सैद्धांतिक आणि उपयोजित अभ्यासातील संशोधन अद्याप समाधानकारक नाही. याचे प्रमुख कारण म्हणजे ज्या विद्यापीठांनी पदव्युत्तर अभ्यासक्रम चालू केला, तेथे संशोधन प्रकल्प आणि प्रात्यक्षिक प्रशिक्षण यांवर भर न देता ते शिक्षण फक्त सैद्धांतिक भाषाविज्ञान शिकविण्यापुरते मर्यादित ठेवले गेले. विद्यापीठ अनुदान आयोगाने काही प्राध्यापकांच्या प्रकल्पांना मान्यता दिली असली तरी बोलीभाषांची पाहणी, विविध शब्दकोशांची निर्मिती व ते वेळोवेळी अद्ययावत करणे, कन्नड भाषा-शिक्षणासाठी मुद्रित आणि इलेक्ट्रॉनिक पूरक साहित्य निर्माण करणे, प्रशासन व कायदा या क्षेत्रांतील उपयोजनासाठी प्रशिक्षण पुस्तिका तयार करणे, हिंदी, उर्दू, इंग्लिश, मराठी आणि इतर भाषांमधून आलेल्या शब्दांची हाताळणी, सांस्कृतिक अभ्यास, व्यक्तिनामे व स्थलनामे यांचा अभ्यास, व्यवसायविशिष्ट शब्दकोशांची निर्मिती, तमिळ-कन्नड, तेलुगु-कन्नड, उर्दू-कन्नड आणि मराठी-कन्नड या भाषांचे अभिसरण; भाषांतर इत्यादींच्या अभ्यासाचे कोणतेही दीर्घकालीन प्रकल्प नव्हते.

**शिवराम कारंथ** (*'सिरिगन्नडा अर्थकोष'*, १९४९) **टी.टी. शर्मा** (*'मूल द्राविड भाषे पैशाची भाषेया ?'*, १९७०, *'पैशाच्या भाषेये; प्राचीन द्राविड'*, १९७०, *'पंच द्राविड भाषेगळ मूल यावुदु ?'*, १९७०), **टी. केशव भट्ट** (*'हव्यक पदसंचय'*, १९७२, *'अन्यदिशिया शब्दकोश'*, १९६४, *'होसागन्नडा व्याकरण'*, १९९७, *'कन्नड प्राचीन साहित्य लक्षनगळु : मरूनूत'*, १९९०), **आर्.वाय्. धारवाडकर** (*'कन्नड भाषाविज्ञान'*, १९५०, *'कन्नड भाषाविज्ञान'*, १९५१, *'कन्नड व्याकरण परंपरे'*, १९४७), **शाम बा. जोशी** (*'कन्नुडीय जीवन'*, १९४४, *'कन्नड नादु-कन्नडु'*, १९४६, *'कन्नडु मत्तु कन्नडा नुडी'*, १९३४, *'कन्नुडीय हट्टु'*, १९६२, *'कन्नड नुदीय जीवाल'*, १९४१, *'महाराशरद मूल'*, १९४१, *'नम्म सोळिना हेसरू' 'कन्नुडी'* एंदारे हेक्कु शरी *अलावी?'*), **के. कुर्तकोटी** *'वचनगल भाषे मत्तु स्वरूप'*, १९९५, **एल्.एस्. शेषगिरी राव** (*'कन्नड अलीवु-उलीवु'*, १९८३, *'कन्नड लँग्वेज'*, १९८५, *'प्रिय कन्नड बंधु, कन्नड-कन्नडिगा-कर्नाटका'*, १९९०) **टी.वी. वेंकटचल शास्त्री** (*'डेव्हलपमेंट ऑफ ओल्ड कन्नड लँग्वेज अँड लिटरेचर'*, १९९०, *'इन्फ्लुअन्स ऑफ मॉडर्न लँग्वेजिस ऑन कन्नड'*,

*१९८८, 'कन्नड आदुमातु बवनिगेगलल्ली विकल्प रूपगलु सामान्य प्रमाधगलु', १९९७, 'वड्डाराधनेय दीसि', १९६०, 'कन्नडदल्ली वर्नपल्लतद केलवांशगलु', १९६७, 'शब्दार्थ विचार', १९७९, 'कन्नडदल्ली यमलशब्दगलु', १९९७, 'श्रीवत्सनिघंटु', १९७१ आणि १९९७, 'कन्नड टेक्निकल टर्म्स इन एन्शंट कन्नड ग्रमॅटिकल', 'प्रोसोडियल अँड ऱ्हेटॉरिकल वर्क्स', 'संस्कृत मत्तु कन्नड निघंटु साहित्य', १९८८, 'सोशोलॉजिकल प्रॉब्लेम्स इन कन्नड लेक्सिकॉन', १९८६, 'होसगन्नड व्याकरण', १९९०, 'आर्यग्रंथगलल्ली चंदस्सिन विषयगलु', १९९१), डी. जवरेगौडा ('कन्नड भाषे इंदु', १९६७, 'कन्नड नुदीय हिरिमे', १९६६, 'ए नोट ऑन नेम चेंज', १९८२, 'प्लेस नेम्स इन फोकलोर', १९८६, 'सम स्ट्रीट नेम्स इन मैसूर सिटी', १९८०, 'सम स्ट्रे थॉट्स ऑन निक्नेम्स', १९८१, 'ए स्टडी ऑफ व्हिलेज नेम्स इन मैसूर डिस्ट्रिक्ट', १९९५, 'ऊरा हेसरुगलु, प्लेस नेम्स', १९५६, 'भारतीय भाषेगलल्लि निघंटु रचने', १९७०), एम्. एम. कलबुर्गी ('कन्नड नामविघ्नना', १९८९), व्ही. के. गोकाक ('होसगन्नड वाक्यरचने', १९५१) या सर्व साहित्यिकांनी कन्नड भाषाविज्ञानासाठी आपल्या वैचारिक लेखनातून चांगला पाया रचला.*

हल्लीच्या काळात उपयोजनात्मक भाषाविज्ञानावर जास्त भर देण्यात येतो. यातही भाषा शिकविण्यावर लक्ष केंद्रित केले जाते. मैसूरला केंद्रीय भारतीय भाषा संस्था स्थापन झाली आणि संपूर्ण देशभरात ही संस्था भाषा संशोधन आणि अभ्यासाचा समन्वय साधणारी प्रमुख संस्था ठरली. अनेक विद्यापीठांशी आणि राज्य शैक्षणिक विभागांशी सलोख्याचे संबंध स्थापन करण्यात या संस्थेला यश प्राप्त झाले आहे. परिणामी कन्नड भाषाविज्ञानाची भरभराट झाली. अनेक नवीन क्षेत्रे ओळखून तेथे संशोधन करण्यात आले. ए. रामानुजन ('ए जनरेटिव्ह ग्रामर ऑफ कन्नड', १९६३, 'टु रेल्म्ज ऑफ कन्नड फोकलोर', १९८६, 'टु कन्नड स्टाइल्ज', १९६७) एस्.एन्. श्रीधर ('प्रिफिक्सेशन इन कन्नड', १९८८, 'डायग्लॉसिया इन कन्नड', १९८०, 'इंदिना कन्नड : रचने मत्तु बलके', १९९६, 'कन्नड', १९८९, 'लँग्वेज मॉडर्नायझेशन इन कन्नड', १९९२, 'कन्नड' १९९४, 'लिंग्विस्टिक कॉन्व्हर्जन्स : इंडो आर्यनायझेशन ऑफ द्राविडियन लँग्वेजिस', १९८१, 'ऑन दि फंक्शन्स ऑफ कोडस्विचिंग इन कन्नड', १९७८, 'दि आर्यनायझेशन ऑफ कन्नड लेक्सिकॉन', १९७५, 'मॉर्फीलॉजिकल लेव्हल्स इन इंग्लिश अँड कन्नड', १९८३, 'क्लॉज युनियन अँड रिलेशनल ग्रामर एव्हिडन्स फ्रॉम हिब्रू अँड कन्नड', १९७७, 'न्यू एव्हिडन्स फॉर स्पाँटेनियस डिमोशन', १९७९), एम्.आर्. रंगनाथ ('दि मैसूर-धारवाड कन्नड डायलेक्ट्स : ए कंपरॅटिव्ह स्टडी', १९६३, 'कन्नड फनिमिक अँड मॉर्फोफनिमिक

फ्रिक्न्सी काउंट', १९६६, 'मॉर्फिमिक अनॅलिसिस ऑफ दि कन्नड लँग्वेज', १९८२), के.व्ही. तिरुमलेश ('कन्नड डेटिव्ह ॲलोमॉर्फी', 'एक्स्प्लनेशन अँड अंडरस्टँडिंग', १९९१, 'दि लँडस्केप ऑफ लँग्वेज : इश्यूज इन कन्नड लिंग्विस्टिक्स', २०००, 'मिड स्पीच इन कन्नड', १९८४), गुरुबसवे गौडा ('ए नोट ऑन 'आर्' इन सोलिगा कन्नड', १९७१, 'डिस्क्रिप्टिव्ह अनॅलिसिस ऑफ सूलिगा', १९६८, 'ए प्रपोजल फॉर मशिन-रायटिंग-कन्नड इन शॉर्टहॅंड', १९९५), एच्.एम्. महेश्वरैया ('करंट ट्रेंडस् इन प्लेस नेम्स ऑफ कर्नाटका', १९८१, 'टोपोनॉमी ऑफ कर्नाटका', १९९४, 'ए स्पेक्ट्रोग्राफिक ॲनॅलिसिस ऑफ लिक्विडस् इन कन्नड', १९८६, 'क्रियात्मक व्याकरण', १९९७), शालिनी रघुनाथ ('कन्नड भाषेय प्राचीनते', १९९४, 'कन्नड शिस्त रूप', १९९४, 'भाषे मत्तु उपसंस्कृती', १९९४, 'उत्तर कन्नड जिल्लेय कन्नड' १९९४, 'उपभाषे', १९७९, 'हव्यक भाषा अध्ययन', 'ओंदु समिक्षे', १९९३), बी.एन् चंद्रैय्या ('पूर्वद हलगन्नड', १९७१, 'ए डिस्क्रिप्टिव्ह ग्रामर ऑफ हरिजन डायलेक्ट', १९७९, 'दि पॅसिव्ह व्हॉइस इन कन्नड', १९७२), ए. शंकर केडीलय ('ॲनॉलॉजी इन कन्नड', १९७१, 'फॉरिन लोन वर्ड्स इन कन्नड', १९६३, 'दि वर्ड्स/उळ्ळु/ अँड/उंटु/ इन द्राविडीयन लँग्वेजिस', १९७१, 'तुळु-इंग्लिश निघंटु', १९६७, 'सम मोअर फनेटिक कॉरस्पाँडन्सेस बिटवीन कन्नड अँड तुळु', १९७३, 'किट्टेल्स कन्नड ग्रामर', १९६५, 'शब्दमणिदर्पण', १९६६), ए. मुरीगेप्पा ('केशिराजन शब्दमणिदर्पण-ओंदु भाषासात्रद विवेचने', १९८२, 'लिंग्विस्टिक अनॅलिसिस ऑफ कलोक्वियल कन्नड इन बिदर डिस्ट्रिक्ट', १९७८, 'लेक्सिकल रिडुप्लिकेशन इन कन्नड', 'पेपर्स इन कन्नड लिंग्विस्टिक्स', १९८०), 'पर्सनल नेम्स ऑफ कर्नाटका', १९९४, 'अँथ्रोपोनॉमी इन कर्नाटका-सम ऑब्झर्वेशन्स', १९८४, 'निगेटिव्हज् इन कन्नड अँड तमिळ', १९८१), सी.एस्. रामचंद्र ('कन्नड भाषालोचन', १९९९, 'स्टडीज इन कन्नड लिंग्विस्टिक्स अँड स्टाइल', १९९९) सोमशेखर गौडा ('दि स्ट्रक्चर ऑफ लीगल अँड ॲडमिनिस्ट्रेटिव्ह कन्नड' १९८९, 'भाषेरचने मत्तु बलके', २०००, 'भाषाविज्ञान इत्तिचिना प्रवृत्तिगलु', १९९२, 'भाषाविज्ञान विवक्षे', १९८१, 'कन्नड भाषे' १९९८, 'कन्नड इन मैसूर सिटी', १९९८), बी. मल्लिकार्जुन ('आदलितगाररिगे कन्नड', १९८०, 'ए डिस्क्रप्टिव्ह अनॅलिसिस ऑफ येरवा', १९८३, 'ए लँग्वेज मूव्हमेंट इन कर्नाटका', १९८५, 'ब्यानकिनवरिगे कन्नड', १९८४, 'पत्रकारतरिगे कन्नड', १९८३, 'औद्यमिक कन्नड', १९९०, 'ए वर्कबुक ऑन ॲडमिनिस्ट्रेटिव्ह कन्नड', १९८६, 'ॲन इंट्राडक्शन टु कन्नड स्क्रिप्ट - रीडिंग अँड रायटिंग', १९८५, 'व्होकॅब्युलरी एज्युकेशन', १९८५, 'कॉझेटिव्ह कन्स्ट्रक्शन्स इन कन्नड', १९८३, 'सरिहेज्जे', १९८७,

'होसहेज्जे', १९८८, 'मोदल हेज्जे', १९८५)

पी.पी.गिरिधर ('ए केस ग्रामर इन कन्नड', १९९२), के.पी. आचार्य ('लँग्वेज यूज इन एज्युकेशन इन कर्नाटका, ए हिस्टॉरिकल रिव्ह्यू', १९९२), आर्. अमृतवल्ली ('कन्नड क्लॉज स्ट्रक्चर्स', १९८८, 'ए कन्नड पर्स्पेक्टिव्ह ऑन मॉर्फालॉजिकल कॉझेटिव्ह' १९९७, 'लेक्सिकल ॲनाफोरा इन कन्नड', 'निगेशन इन कन्नड', १९७७), एच्.एस्. अनंतनारायण ('द इन्फ्लुअन्स ऑफ संस्कृत ग्रॅमॅटिकल ट्रॅडिशन इन द डिस्क्रिप्शन ऑफ सिंटॅक्स ऑफ कन्नड इन शब्दमणिदर्पण', १९७८, 'कन्नडदल्लीरुव समक्रीत प्रययगलु', १९७५), एस्. चंद्रशेखर ('लेक्सिकल मॉर्फालॉजी अँड फोनॉलॉजी ऑफ कन्नड', १९८८, 'केसमार्कर्स अँड प्रेपोजिशन्स इन कन्नड', १९९१), बी.टी. देसाई ('बायलिंग्वल कोडस्विचिंग ॲज ए लिटररी डिव्हाइस : ए कन्नड एक्झांपल', १९८१, 'कोडस्विचिंग, लँग्वेज मिक्सिंग अँड लँग्वेज डेव्हलपमेंट - ए कन्नड एक्झांपल', १९८८, 'ए लिंग्विस्टिक स्टडी ऑफ दि इंग्लिश एलिमेंटस् इन कन्नड - इंग्लिश कोडस्विचिंग', १९८२), टी.एस्. सत्यनाथ ('कन्नडिगा इन दिल्ली : ए सोशिओलिंग्विस्टिक स्टडी', १९८२, 'ऑन चेंज अँड व्हेरिएशन ऑफ (१) इन कन्नड', १९९१), ए.व्ही. नवद ('गोविंद पै पदप्रयोग कोश', 'डिक्शनरी ऑफ वर्ड्स यूज्ड इन दि वर्क्स ऑफ मंजेशरा गोविंद पै', १९८६), राजेश्वरी महेश्वरैया ('भाषाविज्ञान', १९८९, 'कन्नड भाषा स्वरूप', १९९७, 'स्टायलिस्टिक्स अनॅलिसिस ऑफ वचनाज ऑफ बसवेश्वर, रिसर्च पेपर'), के.एस्. नागराज ('ए कंपॅरिटिव्ह नोट ऑफ द व्हर्बज् फॉर 'कॉल' अँड 'शाऊट' इन कन्नड अँड संकेती तमिळ', १९८३), आर्. सुब्बक्रिश्न ('निगेटिव्ह प्रोहिबिटिव्ह 'अल' इन कन्नड अँड तमिळ - ए पॅरॅलेलिझम', १९८१, 'रिलेटिव्ह क्लॉजेस इन कन्नड', १९८१), एल. हलेमने ('कन्नड व्याकरण : ओंदु विवेचने', 'ॲन इंटेन्सिव्ह कोर्स इन कन्नड', १९९६), एम्.एन्. लीलावती ('ॲन इंटेन्सिव्ह कोर्स इन कन्नड', १९९६), सी. रामस्वामी ('इन्फ्लुअन्स ऑफ कन्नड ऑन एज्युकेटेड तमिळ स्पीकर्स ऑफ हिरियुर', १९७५, 'कन्नड भाषानुयोग', १९८१, 'केस एक्स्प्रेशन्स इन कन्नडा डायलेक्टस', १९७६, 'दि इनफिनिटिव्ह इन कन्नड', १९८०, 'प्रोनॉमिनल सफिक्सेस इन कन्नड डायलेक्टस', १९८१, 'ऑक्झिलरी व्हर्ब्ज इन कन्नड', १९८१, 'द लँग्वेज ऑफ कन्नड इन्स्क्रिप्शन्स : नॉर्दर्न कर्नाटका फ्रॉम १००-१४००', १९८३), टी. रामकृष्ण शेट्टी ('लेक्सिकल ऑपोझिटस् इन कन्नड', १९८५), किकेरी नारायण ('कन्नड स्पीच साउंडस् फॉर सेकंड लँग्वेज लर्नर्स', १९९४), के.एस्. यदुराजन ('कॉम्प्लिमेंटेशन इन इंग्लिश अँड कन्नड', 'एनपी-गॅप बायंडिंग इन कन्नड', १९८२, 'सब्जसन्सि : काउंटर-

एव्हिडन्स फ्रॉम कन्नड', १९८६), एस्.एस्. यदुराजन ('मोदल हेज्जे', १९८५, 'होसा हेज्जे', १९८८, 'औद्यमिक कन्नड', १९९०, 'कन्नड थ्रू लँग्वेज गेम्स', १९८६, 'कन्नड न्यूजपेपर रीडर', २००५) या सर्वांनी नव्वदच्या दशकात आणि एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीला कन्नड भाषाविज्ञानात खूप भर घातली.

सध्या कर्नाटक राज्यातील काही विद्यापीठांतून आणि डेक्कन महाविद्यालय, पुणे, दिल्ली विद्यापीठ, अन्नामलाई विद्यापीठ, केरळ विद्यापीठ, त्रिवेंद्रम यांसारख्या इतर ठिकाणी भाषाविज्ञान शिकवले जात असल्यामुळे अनेक विद्यार्थी आणि शिक्षक कन्नड भाषाविज्ञानाच्या अनेक पैलूंचा अभ्यास करीत आहेत. ■

रिसर्च असिस्टंट
सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजिज् मैसूर

## महाराष्ट्रातील मराठी भाषक

इसवी सन २००१च्या जनगणनेनुसार विविध राज्यांमध्ये त्या त्या राज्यांची भाषा मातृभाषा म्हणून बोलणाऱ्यांची संख्या पुढीलप्रमाणे :

| राज्य/प्रांत | भाषा | %(टक्के) |
|---|---|---|
| केरळ | मल्याळम | ९६ टक्के |
| पंजाब | पंजाबी | ९१ टक्के |
| तमिळनाडू | तमिळ | ८९ टक्के |
| पश्चिम बंगाल | बंगाली | ८५ टक्के |
| आंध्र प्रदेश | तेलुगु | ८४ टक्के |
| गुजरात | गुजराती | ८४ टक्के |
| महाराष्ट्र | मराठी | ६९ टक्के |

प्रेषक - एस्.एस्. जोशी, अहमदाबाद

# व्यथा इंग्रजीच्या शिक्षणाची

वंदना भागवत

सिंदबादच्या म्हाताऱ्यासारखे इंग्रजीच्या भीतीचे जे भूत आपल्या मानगुटीवर बसले आहे ते उतरता उतरत नाही. भले मान कापून इंग्रजीच्या हाती देऊ पण पायातले बळ कसे वाढेल याचा विचार करणार नाही अशी आजची परिस्थिती आहे. तिच्यात भले भले शिक्षणतज्ज्ञसुद्धा वैचारिक गोंधळाची भर घालत असतात.

शिक्षण बालककेंद्रित असायला हवे, आनंददायी असायला हवे ही शिष्टाचाराची भाषा आता सर्वमुखी झाली आहे. प्रत्यक्षात बालककेंद्री किंवा आनंददायी म्हणजे काय याचा विचार करायला पालकांना वेळ नाही आणि त्यामुळेच काही वेगळे प्रयोग करू इच्छिणाऱ्या शाळा वगळता इतर शाळांनाही ते परवडत नाही.

इंग्रजी शिकायचे तर इंग्रजी माध्यमात घालणे हा सोपा मार्ग वाटतो. याचे कारण आपले भाषा-शिक्षणाविषयी असलेले अज्ञान. मुळात मूल भाषा परिसरातून शिकते हे सत्य आपल्याला आत्मसात करावे लागेल. म्हणजेच परिसराशी वेगवेगळ्या पद्धतीने - जास्तीत जास्त प्रकारे जोडून घेणे महत्त्वाचे असते. घरात, शेजारी-पाजारी, मैदानात, दुकानात, बाजारात, चित्रवाणी व नभोवाणीवर जी भाषा मूल ऐकेल त्याने ते ती भाषा शिकेल. समृद्धपणे एक भाषा आली की मुलाची संकल्पनाशक्ती तयार होते. नि त्याला विचार करता येतो. साहजिकच मूल स्वत:च्या प्रज्ञेने विचार परिस्थितीशी जोडूही शकते. ही विचारशक्ती विकसित होणे हा भाषाशिक्षणातील सर्वात महत्त्वाचा टप्पा आहे. मूल लहानपणी अनेक भाषा सहजी बोलू शकते हे खरेच. पण अनेक भाषांचे आवाज त्याच्या कानावर पडण्यापेक्षा एक भाषा जर ते समृद्धपणे शिकले तर त्याची ज्ञानग्रहणाची प्रक्रिया अधिक सहज व संपन्न होते. आपल्या भाषिक वैविध्याचे वास्तव लक्षात घेतले तरी साधारणपणे एक सांस्कृतिक मूल्यव्यवस्था असणाऱ्या भाषा एकमेकींना पूरक ठरतात. अगदी वेगळी भाषा शिकताना हीच प्रक्रिया अधिक जाणीवपूर्वक व आपल्या पहिल्या भाषेशी तुलना करतच होणार. आणि तसे होणे केव्हाही स्वीकारार्ह असते. स्पॅनिश, जर्मन, फ्रेंच, जपानी भाषा जर सोळाव्या वर्षी शिकायला सुरुवात करून आपण उत्तम रीतीने आत्मसात करू शकतो तर

इंग्रजीची रडकथा का ? पहिल्या भाषेच्या विकसित क्षमता दुसरी भाषा शिकताना वापरता येतात.

दुसरी भाषा शिकण्याची प्रक्रिया वेगळी असते. साहजिकच भाषा आपसूक आत्मसात होत असते किंवा ती सतत कानावर पडून आपलीशी करायची असते. ही प्रक्रिया पहिल्या भाषेला लागू केली तरी ती दुसऱ्या भाषा शिकण्याच्या वेळेस लागू करण्याची गरज नाही. इंग्रजी सतत कानावर पडायची झाली तर इंग्रजी माध्यमात मुलांना घालायलाच लागेल. घरीही इंग्रजीतूनच बोलायला लागेल. ज्या शाळा मुलांना शाळेच्या परिसरात इंग्रजीच बोलण्याची सक्ती करतात आणि जे आईवडील घरीही मुलांशी इंग्रजीतून बोलतात त्यांना काय म्हणावे ? आपण जेव्हा हे लक्षात घेऊ की आज तरी आपल्या परिसराची भाषा मराठीच आहे आणि इंग्रजी बोलणे सतत कानावर पडण्याजोगी परिस्थिती नाही. तेव्हा इंग्रजी शिकवण्याच्या पद्धती या वेगळ्याच असाव्या लागतील. मुळात पहिल्या भाषेचा उत्तम विकास झाला असेल तर भाषिक संकल्पना समजायला अवघड जात नाहीत. त्यामुळे त्यांचा बाऊ करण्याचे कारण नाही. मुळात मराठीच येत नसेल तर इंग्रजीही येणार नाही, हे लक्षात घ्यायला हवे.

आनंददायी शिक्षण म्हणजे मुलाला सहजपणे आपले वाटेल, अधिकाधिक घ्यावेसे वाटेल ते शिक्षण. साहजिकच जे शिक्षण त्याच्या भाषेतून दिले जाईल ते त्याला आपले वाटेल. अन्यथा स्पर्धा, संधी, मार्क, शिक्षा अशा अनेक अवैध मार्गांनी मुलाला अभ्यासाच्या मागे पिटाळावे लागेल. लागतेही.

आपला सांस्कृतिक वारसा इतका समृद्ध आहे की त्याचे पूर्ण ज्ञान हे आपल्याला आत्मविश्वास देऊ शकते. मानवी नातेसंबंधांचे, विश्वाचे, ऐहिकतेचे व पारमार्थिकतेचे दर्शन झाले की भाषा आपोआपच आत्मविश्वासाने बोलली जाते. जिथे संकल्पनाच गोंधळलेल्या आहेत, भाषेच्या सर्वव्यापी ताकदीची ओळखच नाही तिथे आपण फक्त इंग्रजीचा न्यूनगंड बाळगत राहू यात नवल नाही. त्यापेक्षाही त्रासदायक म्हणजे केवळ आपल्या शिक्षणाचे पाठ्यक्रम दुसऱ्यांच्या हातात देऊन आपण थांबत नाही तर ते कसे शिकवायचे हेही दुसऱ्यांनाच सांगावे लागते. इतकी वर्षे इंग्रजीच्या निकट सान्निध्यात राहूनही आपल्याला इंग्रजी कशी शिकवावी यांच्या आपल्या पद्धती आपण बनवू शकलेलो नाही. मात्र परकीय रीतीरिवाजांसकट, चालीरीतींसकट आणि सांस्कृतिक गाभ्यासकट आपण पोपटपंची करण्याच्या मागे लागतो. त्यातूनही भाषा येत नाही ही गोष्ट वेगळी !

माझा मला वेगळा, स्वतंत्र आणि सखोल विचार करता येतो व तो त्याच्या सर्व गुंतागुंतीसह मांडता येतो, हे जेव्हा घडेल तेव्हा कोणतीही भाषा हातात हात घालून बरोबरीने चालू लागेल. प्रश्न मूल्यांचा आहे, आपल्या धारणांचा आहे. गोष्टी स्वतंत्रपणे



अनुक्रमणिका

करणाऱ्या कर्त्याच्या भूमिकेत आपण आपल्याला बघतो का की सतत दुसरा कोणीतरी आपली क्षमता ठरवणार आहे आणि त्यामुळे तो दुसरा खूष होईल तेच आपण करणार आहोत या चिंतेतून आपल्याकडे सेवकाची भूमिका घेतो ? यातील निवड करता आली की अधिक हिरिरीने स्वत्व जपण्याचे आणि बाहेरचे जग त्या आत्मविश्वासाने पारखण्याचे - स्वीकारायचे/नाकारायचे आपल्याला बळ मिळेल.

■

134/4/20, अशोकनगर, 2 व्हाईटफील्डस् अपार्टमेंट, पुणे 411007.
दूरभाष : 25530286

---

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- **'वाङ्मयीन शैली : तरंग-अंतरंग'** - डॉ. सुरेश भृगुवार, दिलीपराज प्रकाशन, पुणे. २००७, पृष्ठे २००, किंमत रु. २२५/-
- **'संस्कृत ललित साहित्याचे अनुवादशास्त्र'** - डॉ. सौ. नलिनी चाफेकर, प्रकाशक - म.ग. चाफेकर, ठाणे. २००८, पृष्ठे १२०, किंमत रु. १२०/-
- **'वेलू गेला गगनावरी : प्राचार्य द.रा. कुलकर्णी गौरवग्रंथ'**, परभणी.
- **'चालणारे अनवाणी पाय'** (कवितासंग्रह) - केशव सखाराम देशमुख, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००८, पृष्ठे १११, किंमत रु. ९०/-
- **'वसंतगंधा'** - अनुवादक : माधवी कोल्हटकर. २००६. मेहता पब्लिशिंग हाउस, पुणे. पृष्ठे : ११३. किंमत रु. १२०/-
- **'लीलाकमलपत्राणि'** - (प्रा. लीला अर्जुनवाडकर-गौरव ग्रंथ). पुणे. २००८. पृष्ठे : ३८४. किंमत रु. ३५०/-

**टाइम अँड स्पेस कम्युनिकेशन्स, पुणे यांची प्रकाशने :**

- **'सलील वाघ : निवडक कविता'** - संकलन : जयंत गाडगीळ. १९९६. पृष्ठे : ७+१२०+३. किंमत रु. ८५/-
- **'सध्याची कविता'** - सलील वाघ. २००५. पृष्ठे : ८६+६. किंमत रु.१००/-
- **'ब्लॉग पहिला'** - सलील वाघ. १९९६. पृष्ठे : ११५. किंमत रु. २५/-
- **'शमशेर'** (शमशेर बहादूर सिंह यांच्या हिंदी कवितांच्या मराठी अपभ्रंश) - सलील वाघ. २००५. पृष्ठे : ९८. किंमत रु. ७०/-
- **'आधीच्या कविता : १९८४-८६'** - सलील वाघ. २००५. पृष्ठे : १०+११३. किंमत रु. १००/-

---

# महाविद्यालयीन नियतकालिके : काही निरीक्षणे

· उज्ज्वला बर्वे

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने या वर्षीही महाराष्ट्रातील महाविद्यालयांच्या वार्षिकांची स्पर्धा घेण्यात आली. शहरी भागातील १३ आणि ग्रामीण भागातील १३ वार्षिक अंकांचे स्पर्धेसाठी परीक्षण करण्यात आले. त्या परीक्षणातून नजरेस आलेल्या काही प्रमुख गोष्टी अशा :

महाविद्यालयांच्या दृष्टीने विचार करता, ह्या वार्षिक अंकाची उपयुक्तता दोन प्रकारची असते. एक म्हणजे, महाविद्यालयातील एका शैक्षणिक वर्षात घडलेल्या सर्व महत्त्वाच्या घडामोडींची नोंद घेणे; विद्यार्थी, शिक्षक, कर्मचारी यांच्या दखलयोग्य कामगिरीचा परिचय सर्वांना करून देणे. त्यामुळे बहुतेक सर्व महाविद्यालयांच्या वार्षिक अंकांच्या एकूण मजकुरापैकी निम्मा मजकूर अहवाल, याद्या, छायाचित्रे अशा स्वरूपाचा असतो. महाविद्यालयाशी अपरिचित वाचक बहुतांश वेळी अशा मजकुराची पाने वाचत नाही, पण स्पर्धेसाठी आलेल्या काही महाविद्यालयांच्या वार्षिक अंकांत मात्र असा अनिवार्य मजकूरसुद्धा कल्पक आणि कलात्मक पद्धतीने सादर केलेला दिसला. अशा मांडणीमुळे तो एकसुरी न वाटता वाचनीय झाला.

या वार्षिक अंकांची दुसरी उपयुक्तता म्हणजे, विद्यार्थ्यांच्या लेखनगुणांना त्याद्वारे वाव देता येतो. सर्व वार्षिकांमध्ये विद्यार्थी, शिक्षक यांचे लेख, कविता, कथा, ललित लेख इत्यादी साहित्य मोठ्या प्रमाणावर वाचावयास मिळते. त्यामुळे स्पर्धेसाठी परीक्षण करताना या भागावर अधिक लक्ष केंद्रित करण्यात आले. कल्पक मुखपृष्ठ, विद्यार्थ्यांचा सहभाग, विषयांचे वैविध्य, लेखनाचा दर्जा, मांडणी इत्यादी निकषांवर स्पर्धेतील विजेते ठरवण्यात आले.

बहुतेक प्रत्येक अंकात मराठी, इंग्रजी आणि हिंदी या तीनही भाषांमध्ये विद्यार्थ्यांच्या कविता आणि लेख प्रसिद्ध करण्यात आले आहेत. त्यामुळे काही वेळा विषयांची पुनरुक्ती झालेली आढळली. काही कला महाविद्यालयांच्या अंकांत स्वतंत्र संस्कृत विभागही आहे. कथांचे प्रमाण या अंकांमध्ये फारसे आढळले नाही. ललित किंवा माहितीपूर्ण लेख लिहिण्यावर विद्यार्थ्यांचा भर आहे असे दिसले. कवितांमध्ये

आई, मैत्री आणि (अर्थातच) प्रेम या विषयांवरच्या कविता अधिक आहेत. एका अंकात तर सध्या गाजत असलेल्या एका कवीची कविता एका विद्यार्थ्याने स्वत:च्या नावावर प्रसिद्ध केली आहे !

वार्षिक अंक हे अभिव्यक्तीचे मुद्रित माध्यम असल्याने जे विद्यार्थी लिहू शकतात त्यांनाच वार्षिकात सहभागी होण्याची संधी देण्याची प्रथा पडली आहे. पण आता मुद्रणतंत्रज्ञानातील प्रगतीमुळे फक्त लिखित मजकूरच छापण्याचे बंधन उरलेले नाही. हे लक्षात घेऊन काही महाविद्यालयांनी विद्यार्थ्यांची उत्तम चित्रे, रांगोळ्या, छायाचित्रे वार्षिकात प्रसिद्ध करून त्याही विद्यार्थ्यांना समाविष्ट करून घेतले आहे. एखाद्या विषयासंबंधी अनेक विद्यार्थ्यांना बोलते करून त्या सर्वांच्या प्रतिक्रिया काही अंकांमध्ये त्या विद्यार्थ्यांच्या नावांसह छापल्या आहेत. अशा नाविन्यपूर्ण मार्गांचा विचार करणे आणि ते प्रत्यक्षात आणणे यांसाठी शिक्षकांचा वार्षिक अंकाच्या आखणीत आणि निर्मितीत मोठा सहभाग असणे आवश्यक आहे, असेही लक्षात आले.

एका अंकात विद्यार्थ्यांना चांगल्या पुस्तकांची ओळख व्हावी म्हणून नावाजलेल्या पुस्तकांमधील वेचे दिले आहेत आणि विशेष म्हणजे त्या पुस्तकांचा महाविद्यालयाच्या ग्रंथालयातील नोंदणी क्रमांकही दिला आहे; तर दुसऱ्या एका अंकात विज्ञानविषयक लेखनाचा स्वतंत्र विभाग केला आहे. काही अंक विशेषांक म्हणूनही काही महाविद्यालयांनी घोषित केले आहेत. उदा० एक अंक भाषा या विषयाला वाहिलेला आहे, तर दुसरा शेतकऱ्यांच्या आत्महत्या या विषयासंबंधी आहे.

महाविद्यालयांचे वार्षिक अंक सहसा महाविद्यालयाच्या बाहेर वाचायला मिळत नाहीत. ज्या विद्यार्थ्यांसाठी ते प्रसिद्ध केले जातात ते विद्यार्थीदेखील किती आवडीने ते अंक वाचतात ते नेमके समजणे अवघड आहे. परंतु अशा स्पर्धांमुळे वार्षिकांचा दर्जा उंचावायला मदत होईल आणि काही वार्षिक अंकांना नियतकालिकांमध्ये एक वेगळे स्थान मिळेल अशी आशा करायला हरकत नाही.

■

बी/1004, काकडे सिटी, वारजे, पुणे 411052.
दूरभाष : 25209049

दखलयोग्य

# छोट्या भाषांचे भवितव्य

डॉ. के. एस्. राज्यश्री

ऑस्ट्रेलियात १९१० ते १९७० या काळात एक लाख आदिवासी मुलांना त्यांच्या पालकांपासून बळजबरीने वेगळे काढण्यात आले. हा समाजच उद्ध्वस्त करण्याचा डाव यामागे होता. वसाहतपूर्व ऑस्ट्रेलियातील जवळजवळ शंभर भाषा नष्ट होण्याच्या स्थितीत आहेत. तेथील मुलांच्या शिक्षणात अंतर्भाव असलेल्या भाषांची संख्या फक्त वीस आहे. न्यूझीलंड, अमेरिका, स्कॉटलंड आणि जपान या देशांतीलही अशीच उदाहरणे सांगता येतील. अमेरिका, ऑस्ट्रेलियात युरोपीय समाजांनी तेथील मूळच्या रहिवाशांचा वंशसंहारच केला. भारताचा इतिहास प्रामुख्याने 'जगा आणि जगू द्या' या विचारसरणीचा आहे.

अंदमानमध्ये एका अंदमानी आदिवासी गटाची लोकसंख्या फक्त ४२ आहे; मात्र त्यांनी त्यांची भाषा टिकवून ठेवली आहे. इसवी सन १६०३ मध्ये निलगिरी टेकड्यांवर टोडा भाषा बोलणारे फक्त आठशे जण होते. चार शतकांचा कालावधी उलटून गेल्यानंतरही आजतागायत ती भाषा टिकून आहे. ती बोलणाऱ्या एक हजार व्यक्ती आहेत. भारतात अगदी अल्पसंख्य समूहांच्या भाषाही टिकून राहिल्या याचे कारण भाषिक व सांस्कृतिक सहिष्णुता. स्वातंत्र्यानंतर भाषावार प्रांतरचना झाली. त्यानंतरच्या काळात मात्र भाषिक सहिष्णुता कमी होत गेली; छोट्या अस्मितांना मानायचेच नाही, अशी प्रवृत्ती वाढत गेल्याचे दिसते.

बहुसंख्याकांची भाषा बोलणाऱ्यांच्या भाषाविषयक दृष्टिकोणातच बदल झाला असे नाही; तर छोट्या भाषा बोलणारे लोकही स्वत:च्या भाषेकडे वेगळ्या नजरेने पाहू लागले. उदाहरणार्थ, शिक्षणाच्या क्षेत्रात ६९ भाषा शिक्षणाचे माध्यम म्हणून किंवा विषय म्हणून शिकल्या-शिकवल्या जात होत्या. ती संख्या आता फक्त ३३वर आली आहे. लहान भाषा समूहातील लोकही प्रादेशिक भाषेचा स्वीकार करताना दिसू लागले आहेत. पुढील शिक्षणाच्या व रोजगाराच्या संधींचा विचार करून लहान भाषा बोलणाऱ्या समाजगटांतील तरुण मंडळी त्या त्या भागातील प्रादेशिक भाषाच निवडताहेत.

या दृष्टिकोणातील बदलांप्रमाणेच जनसंज्ञापनमाध्यमांची जी लाट आली आहे, तिचाही परिणाम जाणवत आहे. छोट्या भाषकसमूहांना त्यांच्या भाषांतील कार्यक्रम दृक्‌श्राव्य माध्यमांमधून मिळत नाहीत. आकाशवाणीवर आदिवासींच्या वेगवेगळ्या बोलींमधून कार्यक्रम होतात, हे खरे आहे; पण ते जेमतेम तीस ते चाळीस मिनिटांचे असतात. आठवड्यातून एकदा किंवा फार तर दोनदा असे ते सादर होतात. शिवाय त्या कार्यक्रमांचे स्वरूप प्रामुख्याने गाण्यांचे असते. शिक्षण, प्रशासन, राजकीय चर्चा, देशी ज्ञानाचे विश्लेषण यापैकी कुठल्याच बाबतीत त्यांच्या भाषेचा वापर होत नाही, तसा होत नसल्याने आपली भाषा टिकविण्याची प्रेरणाच त्यांना मिळत नाही.

लहान भाषा अस्तंगत होण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे वेगवेगळ्या कारणांमुळे या भाषकांचे होत असलेले स्थलांतर. मोठ्या प्रमाणावर होत असलेली जंगलतोड, विकास प्रकल्पांमुळे होणारे विस्थापन यामुळे हे समाज आपापल्या स्थानावरून बाजूला ढकलले जात असल्याने त्यांना बहुसंख्याकांच्या भाषा स्वीकाराव्याच लागतात. नियोजनाअभावी सुरू असलेले स्थलांतर व विस्थापन यामुळे भाषाच नव्हे; तर वाङ्मय, संस्कृती यावरही कुऱ्हाड मारली जात आहे. ही माणसे विखुरलेली असल्याने भाषा टिकविण्यासाठी एकत्र येण्याची जी गरज असते तीच पूर्ण होत नसल्याने आदिवासींच्या भाषांना घरघर लागल्याचे दिसत आहे.

राष्ट्रसंघाने प्रसिद्धीस दिलेल्या इशारा-पत्रकात वर्णन केल्याइतकी परिस्थिती गंभीर नसली, तरी प्रश्न अस्तित्वात आहे, हे या तपशिलावरून सहजच लक्षात येते. या परिस्थितीत सरकारचा नियोजनपूर्वक हस्तक्षेप आवश्यक आहे. लहान भाषा बोलणाऱ्या समूहांसाठी सरकारने मदतीचा हात पुढे केला पाहिजे. हे गट सामाजिक, आर्थिक विकासाच्या परिघाबाहेर फेकले गेले आहेत. त्यांचा शैक्षणिक व सामाजिक विकास साधला गेला पाहिजे व त्यासाठी संतुलित दृष्टिकोण अंगीकारला गेला पाहिजे. शैक्षणिक व सामाजिक विकासाच्या मुळाशी भाषाविकास असतो, हे येथे लक्षात घ्यावे लागेल. म्हणजेच त्या त्या समाजाचे भवितव्य भाषेच्या विकासावर अवलंबून असते. केंद्रीय भाषा संशोधन संस्था (सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजिज्) लहान भाषा बोलणाऱ्या समूहांचा मानववंशशास्त्रीय व भाषिक अभ्यास करत असते. अशा प्रकारच्या अभ्यासांमधून एकात्मिक भाषाविकासाचा मार्ग सापडू शकतो. मुळात आपल्यासारख्या विविधता असलेल्या देशांत बहुभाषिक कौशल्य आवश्यक बनले आहे. संशोधनात्मक अभ्यास त्याला पूरक ठरेल. छोट्या भाषिक गटांचे सक्षमीकरण त्यातून होईल व एकंदर संज्ञापनातील त्यांचा सहभाग वाढेल. ■

'दै. सकाळ' 28 मे 2008

# ध्वनिसिद्धान्ताचा परिचय आणि उपयोजन

कृष्ण श्री. अर्जुनवाडकर

[परीक्षित ग्रंथ : 'भारतीय ध्वनिसिद्धान्त आणि मराठी साहित्य'. डॉ. जयश्री पाटणकर. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००६. पृष्ठे १०+२११. किंमत रु.१८०/-]

संस्कृत साहित्यसमीक्षेच्या परंपरेतल्या ध्वनिसिद्धान्ताचा सविस्तर परिचय करून देऊन (प्रकरण १; पृ. १-६४) त्याच्या प्रकाशात तीन मराठी ग्रंथांचे समालोचन (प्रकरण २-४; पृ. ६५-१९४) करण्याच्या उद्देशाने हा ग्रंथ लिहिला आहे. या प्रमाणावर असा प्रयत्न यापूर्वी कोणी केलेला आढळत नाही. ग्रंथाच्या अखेरी संदर्भसूची आहे; तीत या विषयावरील २४ मराठी आणि हिंदी ग्रंथांची यादी आहे. प्रत्यक्ष ग्रंथात काही इंग्रजी ग्रंथांतलीही अवतरणे आली आहेत. शेवटी 'पारिभाषिक संज्ञासूची (पृ. १९६-२११) आहे; ग्रंथात आलेले पारिभाषिक शब्द या सूचीत संक्षेपाने विवेचिले आहेत. ग्रंथाचा आरंभ 'आमुख' आणि शेवट 'उपसंहार' नावाच्या चौकटीने झाला आहे. आनंदवर्धनाने (इ.स. ८४०-८७०) *ध्वन्यालोक* हा ग्रंथ लिहून काव्यात / साहित्यात येणारा व्यंजना हा शब्दव्यापार विस्ताराने चर्चा करून प्रस्थापित केला. त्याचा परिचय करून देताना त्याला अनुकूल, प्रतिकूल असे जे प्रवाह संस्कृत परंपरेत निर्माण झाले, त्यांचीही भरपूर तपशिलाने लेखिकेने आरंभीच्या प्रकरणात (पृ. १-६४) रुजवात केली आहे. ध्वनिसिद्धान्ताच्या प्रकाशात निवडक मराठी पुस्तकांचे सविस्तर समालोचन करण्याचा हा पहिलाच प्रयत्न असावा. ही पुस्तके तीन आहेत : (१) *महानिर्वाण* (नाटक; सतीश आळेकर); (२) *कोसला* (कादंबरी; भालचंद्र नेमाडे); (३) *तुझं माझं* (कविता; र. कृ. जोशी). [या विवेचनाचा मूलाधार असा जो आनंदवर्धनाचा *ध्वन्यालोक* हा ग्रंथ, त्याचा साररूप परिचय, त्याचे मूळ ग्रंथातले आधार आणि अन्य अध्ययनसामग्री जिज्ञासूंना माझ्या 'ध्वन्यालोक : एक विहंग-मालोक' (पृ. ६०; टिळक महाराष्ट्र विद्यापीठ प्रकाशित, २००६) या सारग्रंथात मिळतील.]

विषयभूत ग्रंथाचे वेष्टनपृष्ठ 'ध्वनि' शब्दाचा प्रसिद्ध अर्थ (आवाज) ध्यानात घेऊन रंगविलेले दिसते. त्यावर एक बासरी चितारलेली असून तिच्या दुसऱ्या टोकाला लेखणीचं

रूप दिले आहे. पार्श्वभूमीत अक्षरचिन्हांनी (स र ग म प) भारतीय संगीतातली स्वरप्रतीके, आणि पाश्चात्त्य संगीतातली प्रतीके विखुरली आहेत. साहित्यातला अर्थात्मक ध्वनी हा जो ग्रंथाचा विषय, तो या चित्रणातून कसा काय साकार होतो, हा शोधाचा विषय ठरावा. संस्कृत साहित्यशास्त्र आणि ध्वनिसिद्धान्त या विषयांवरचे जे आधारग्रंथ निर्दिष्ट आहेत, त्यांत वीरकर-पटवर्धन (*ध्वन्यालोक*), ग. त्र्यं. देशपांडे (*भारतीय साहित्यशास्त्र*) यांचे मराठी भाषेतले ग्रंथ चार प्रकरणांच्या संदर्भसूचीत सर्वाधिक प्रमाणात नमूद आहेत. उक्त ग्रंथांच्या लेखकांचे उद्दिष्ट यामुळे सफल झाले, असे म्हणता येईल.

अखेरच्या 'पारिभाषिक संज्ञासूची'त (पृ. १९६...) 'अर्थगुण' ते 'अर्थापत्ति' या सहा संज्ञांची वर्णानुक्रमानुसार ठरणारी जागा चुकली आहे; या संज्ञा 'अद्‌भुत' या संज्ञेच्या आधी आल्या आहेत.

**ग्रंथमर्यादा**

हा ग्रंथ लिहिण्यामागे लेखिकेचा उद्देश द्विविध आहे : एक, 'भारतीय साहित्यविचारसंपदेचे ऋण काही अंशी व्यक्त करावे'; दोन, 'एक उपयुक्त सिद्धान्त मराठी अभ्यासकांसाठी पुनरुज्जीवित करून वाहता' करावा. (*आमुख*, पृ. चार.) तथापि काही विधाने लेखिकेचे लक्ष्य असलेल्या साहित्यविचारातील ध्वनि-संकल्पनेचे आकलन शंकास्पद वाटावे अशी आहेत. 'अभिधार्थ वर्तमानकाळाशी निगडित असतो तर व्यंगार्थ भूत वा भविष्यकाळाशी संबंधित असतो' (पृ. २१) याचा अर्थ काय समजावा ? शब्दशक्तींचा असा ठरावीक काळांशी संबंध कसा संभवतो ? शब्दार्थांचा असा काळांशी उपजत संबंध असल्याची माहिती प्राचीन संस्कृत ग्रंथकारांना असल्याचे दिसत नाही. साहित्यकृतींचे विश्लेषण हा साहित्यकृतींइतकाच कल्पनाशक्तीचा प्रांत वाटावा, अशी या ग्रंथाची मांडणी आहे. लेखिकेच्या मताने ही 'बौद्धिक कसरत' (१९४) आहे; आणि ती 'साहित्याचा फायदा' करून देणारी आहे. 'व्यंगार्थाव्यतिरिक्त (व्यंग्यार्थहीन ?) असलेल्या साहित्यव्यवहाराची दखल' घेण्याची तिला गरज वाटत नाही. (साहित्य = वाङ्मय ?) ग्रंथ वाचताना आणखी एक सतत जाणवणारी गोष्ट म्हणजे यात वारंवार येणारी संस्कृत साहित्यशास्त्रातली, विशेषत: आनंदवर्धनाने निर्माण केलेली परिभाषा. संस्कृत साहित्यशास्त्राची मुळातून पुरेशी माहिती असणारा वाचकच या ग्रंथाचे आकलन करू शकेल. मग प्रश्न पडतो की कोणत्या तयारीचा वाचक गृहीत करून हा ग्रंथ लिहिला आहे ? या परिभाषेतही अशुद्ध मुद्रिते कमी नाहीत. ती उलगडण्यासाठी तर वाचक या विषयातला तज्ज्ञच असायला हवा. या संस्कृत परिभाषेच्या जोडीला लेखिकेचा सवयीचा भाग म्हणजे मराठी मजुकरात

इंग्रजी शब्दांची योजना. 'सेक्सुच्युअल ऑब्जेक्ट' (पृ. ७९), सोफिस्टिकेटेड (१००), प्रॅक्टिकल (४१), कन्फेशन (१०५), आयडियल (११७), स्टाईल मार्कर (१२३, १२७), सॅडिस्ट (१३२), आऊटसाईडर (१३३)' इत्यादी. याखेरीज कंसात येणारे, देवनागरीत (रेकॉर्डिंग, डबिंग) किंवा रोमन लिपीत लिहिलेले इंग्रजी शब्द 'संघभावना (contradictory association)' (? पृ. ८१) वेगळेच.

**विषयभूत रचना : 'महानिर्वाण' नाटक**

साहित्याच्या उक्तं मूलभूत स्वरूपाची जाण जागृत असेल, तर लेखिकेने 'महानिर्वाण' नाटकाच्या समालोचनात ध्वनिमूल म्हणून उपस्थित केलेली अभिनयादी अंगे विषयाबाहेरची ठरतात. मूक नाट्यात किंवा नित्याच्या व्यवहारातही आपण प्रसंग-विशेषी मुद्रा, हावभाव, आवाजाचे चढउतार यांच्या साहाय्याने मनोगत व्यक्त करीत असतो. हे सर्व शब्दार्थांच्या कक्षेबाहेरचे घटक साहित्यात कसे समाविष्ट करता येतील ? साहित्यवाचनाने वाचकाच्या मनात रसनिष्पत्ती होते ती साहित्यातील प्रसंगांच्या मानस चित्रणाने. या रसांची उत्पादनसामग्री वाचकाच्या मनातच असते. साहित्याच्या वाचन-श्रवणांनी रसानुभव येतो तो मनातल्या रंगभूमीवरील प्रकटीकरणाने. ही रंगभूमी वाचकाच्या आकलनशक्तीनुसार उण्या-अधिक क्षमतेची, वैयक्तिक असते. रसाच्या उत्पादनसामग्रीला दृश्य रूप मिळते ते केव्हा ? काही साहित्यप्रकार रंगभूमीवर येतात, त्यांना अभिनयादी पोषक अंगांची जोड मिळते, ते सामुदायिक दर्शनाला योग्य होतात, तेव्हा. दोन्ही पक्षीं, लेखकाचा गर्भित आशय त्याच्या वाचक-प्रेक्षक वर्गापर्यंत पोचला नाही, तर साहित्याचे प्रयोजनच बाधित होईल. म्हणून, साहित्यात चित्रित केलेल्या आशयामुळे 'अस्वस्थ झालेला एक तरी माणूस - नाटककार - या जगात आहे, हाच' प्रस्तुत कृतीतील 'प्रतीयमान अर्थ आहे' (पृ. ६९) या लेखिकेच्या विधानाचा आशय नीटसा लक्षात येत नाही. वस्तू, घटना, प्रसंग इत्यादी पाहत/अनुभवत असताना संबद्ध व्यक्तीच्या मनात अनेक संवेदना निर्माण होतात. त्या सर्व साहित्याच्या कक्षेत कशा येतील ?

या दोन-अंकी नाटकाची रचना रूढ संकेत आणि अनुभव धाब्यावर बसवून केलेली आहे. त्यात मेलेला म्हणून दाखविलेला माणूस जिवंत माणसांप्रमाणे बोलत असतो. म्हणजे हे वास्तवाधारित नाटक नाही; कल्पनाधारित आहे, आणि रूढ सामाजिक रूढींची, समजुतींची टवाळी करणारे आहे, म्हणजे विडंबनात्मक आहे. यातील प्रसंग आणि भाषा या उक्त भूमिकेला संवादी आहेत. रूढ रसकल्पनेनुसार याचा प्रधान रस *बीभत्स* (किळसवाणा) हा आहे. (पृ. ७२-७३) या रसाचा उगम *जुगुप्सा* (वीट, तिटकारा) या स्थायी भावात आहे. काही अवास्तव कल्पनांचा अपवाद केला, तर

या रचनेतल्या प्रसंगांची योजना उक्त रसाला अनुकूल आहे. तथापि लेखिकेच्या मतानुसार 'नाटकाचा हेतू नुसता विडंबनाचा, चेष्टेचा नाही, तो हळुवार, चिंतनशील बनविणारा आहे.' (पृ. १११) असे साहित्याच्या चौकटीबाहेरचे परिणाम साहित्यविचाराचा भाग ठरणार नाहीत, आणि ते सर्व वाचक-प्रेक्षकांवर संभवतही नाहीत. साहित्याच्या चौकटीतलेही परिणाम वाचक-प्रेक्षकांच्या व्यक्तिगत संवेदन-शीलतेनुसार न्यूनाधिक प्रमाणात संभवतात. सर्वच कलांना हा नियम उपपन्न आहे.

**ध्वनिप्रकार : मुख्य आणि गौण**

विषयभूत ग्रंथाच्या विश्लेषणात आनंदवर्धनाच्या ध्वनिविवेचनातली परिभाषा (उदा० *असंलक्ष्यक्रमध्वनि* पृ. ९०; *अत्यंततिरस्कृतवाच्यध्वनि* १४७;) वारंवार येते. तीतल्या काही संज्ञा तर (उदा० *अर्थशक्तिमूलसंलक्षक्रमध्वनि* ११८) इतक्या प्रदीर्घ (आंणि सदोष मुद्रितही) आहेत की, जरी लेखिकेने आरंभीच्या प्रकरणात ध्वनिसिद्धान्ताचा त्याच्या परिभाषेत सविस्तर परिचय करून दिला आहे, तरी संस्कृताचे पुरेसे ज्ञान नसलेल्या वाचकाचा गोंधळ उडाल्यावाचून राहणार नाही. अशा परिस्थितीत मुद्रणदोष अमर्याद असले (तसे ते दुर्दैवाने या ग्रंथात आहेत) की आनंदच आनंद. मुद्दा असा आहे की एखादा रस साहित्यकृतीत केंद्रभूत म्हणून रंगविताना त्यापासून लक्ष विचलित होईल अशी रचना समर्थनीय ठरेल का ? रसाव्यतिरिक्त वस्तुध्वनी आणि *अलंकारध्वनी* असे आणखी दोन मूलभूत ध्वनिप्रकार आहेत. आणखी वेगळ्या, व्यापक दृष्टिकोणातून होणाऱ्या मुख्य आणि मिश्र ध्वनिप्रकारांचा (एकूण १०,४५५) आराखडा / हिशेब जिज्ञासूंना माझ्या *काव्यप्रकाशाच्या* मुद्रावृत्तीत, *उपन्यासात* (पृ. ०१२१...) पाहता येईल. हे बरेचसे प्रकार लहानसहान काव्यकृतींत (उदा० *गाहासत्तसई*, म्हणजे गाथासप्तशती, या प्राकृत कविता-संग्रहातल्या रचनांत) संभवणारे आहेत. रसप्रधान कृतीविषयी चर्चा करिताना अशा प्रकारांचा (प्रस्तुत ग्रंथात आहे तसा) ऊहापोह मुख्य उद्दिष्टापासून वाचकाची दृष्टी विचलित करणारा ठरावा.

**'कोसला' कादंबरी**

*कोसला* ही सहा प्रकरणांची, 'बहुचर्चित, चौकटी मोडणारी... कादंबरी' (११३) आहे, असा तिचा परिचय आरंभीच करून दिला आहे. पांडुरंग नावाचा सांगवी या खेड्यातला विद्यार्थी 'विद्येचे माहेरघर' अशा पुण्यात शिक्षणासाठी येतो; पुण्याच्या ('पुणेरी') जीवनपद्धतीत स्वत:ला सामावून घेण्याचा पुष्कळ प्रयत्न करूनही अयशस्वी होऊन नैराश्याने शिक्षणाची वाट सोडून देऊन तो आपल्या खेडेगावी परत जातो. 'निरागसता, उत्कटता, प्रेम' या गुणांवर प्रेम करणारा पांडुरंग, त्यांना बाधक असलेले शहरी जीवन आणि वातावरण पाहून विटतो आणि शिक्षण सोडून देतो. पारंपरिक

संकेतानुसार यात प्राधान्याने निर्वेदमूलक (विरक्तिमूलक) *शांत रस* वाटतो; पण लेखिकेने काही पुरावे देऊन *रौद्र रस* ठरविला आहे. (१४६) येथे हे ध्यानात घेतले पाहिजे की एखाद्या साहित्यकृतीत व्यापक असा प्रधान रस एक असूनही त्याला अंगभूत म्हणून प्रसंगानुसार अन्य रस येऊ शकतात. *अभिज्ञानशाकुंतल* इत्यादी कृतींत या वास्तवाचा प्रयत्य येऊ शकेल. मधल्या काळात सुरवातीला भीतिग्रस्त, पण नंतर 'थोर होण्याच्या इच्छेने' (११४) भीती टाकून दिलेला पांडुरंग अन्य विद्यार्थ्यांमध्ये मिसळून 'कॉलेजमध्ये चमकतो.' त्याचे वाचन, अवलोकन, डायरीलेखन, अंगावर घेतलेल्या सामुदायिक जबाबदाऱ्या, चुका, प्रामाणिकपणा, सहानुभूती, बापाशी संबंध तुटणे, अशा अनेक सवयी आणि प्रसंग यांतून त्याचे स्वभावचित्रण केले आहे. यात लघुकथा, कादंबरी, नवकविता (१२६) इत्यादी वाङ्मयप्रकारांविषयी गुरुजींशी, प्रा. गुण्यांशी, झालेल्या वादांतून त्याची मते प्रकट झाली आहेत : 'लघुकथा हा क्षुद्र व दुय्यम वाङ्मयप्रकार आहे', 'कादंबरी म्हणजे फसलेलं महाकाव्य', 'लघुकथा म्हणजे फसलेली गोष्ट', 'चांगली कविता गाणं असते', इत्यादी. यांपैकी काही मते खुद्द *कोसला* - लेखकाची आहेत, असे लेखिकेने या संदर्भात नमूद केले आहे. या प्रसंगांतून ठिकठिकाणी विविध ध्वनिप्रकार कसे प्रकट झाले आहेत, ते लेखिकेने नामनिर्देशपूर्वक तपशीलवार नमूद केले आहेत. यांपैकी एका ठिकाणी 'नऊ हजाराच्या शतकातले इतिहासकार' असा 'भंकस' निर्देश आला आहे, तो 'संलक्ष्यक्रम विवक्षितवाच्यपर-ध्वनीचा उत्कृष्ट नमुना आहे', (१२७) असा लेखिकेचा अभिप्राय आहे. अशा पारिभाषिक संकल्पनांच्या, मुळाशी मेळ न बसणाऱ्या निर्देशांवरून वाटू लागते की ही लेखिकेने ध्वनिसिद्धान्तात स्वत: नव्याने घातलेली भर आहे की काय ?

**कविता - 'तुझं माझं'**

लेखिकेने ज्या तीन मराठी रचना ध्वनिप्रधान म्हणून निवडल्या आहेत, त्यांत एक (तिसरी) आहे कविता, 'तुझं माझं' नावाची. यावरील टीकालेख एकूण ३० पृष्ठांचा असून त्यातली केवळ दोनअडीच पृष्ठे कवितेने व्यापली आहेत. (बादरायणांच्या ५५५ ब्रह्मसूत्रांवर शंकराचार्यांचे ५०० पानी भाष्य आहे; त्याची या प्रसंगी आठवण होते.) या कवितेत काही ओळींत दोनदोनच शब्द असून ते ओळीच्या आरंभी एक आणि अंती एक, असे मांडले आहेत. या शब्दांमधल्या अंतरांत, कोऱ्या जागेत 'ध्वनिसौंदर्य सामावलेले' आहे (पृ. १६१), असा लेखिकेचा दावा आहे. कवितेचा काही भाग उभ्या शैलीत तर काही भाग तिरप्या शैलीत (इटॅलिक), काही भाग साध्या शैलीत तर काही ठळक (जबरा टाइप) शैलीत दिला आहे. हे विविध प्रकार व्यंजक म्हणून अभिप्रेत आहेत. प्रस्तुत ग्रंथाला आधार म्हणून वारंवार निर्देश केले जाणारे

संस्कृत ग्रंथ साहित्यशास्त्रावरचे आहेत; आणि साहित्याचे घटकावयव शब्द आणि *अर्थ* हे असल्याचे या ग्रंथांत नमूद किंवा गृहीत आहे. अशा परिस्थितीत अक्षरांचे तांत्रिक मुद्रणभेद आणि कोरी जागा व्यंजक ठरू लागली, तर मुद्रणाची शाई, ग्रंथाची बांधणी (बाइंडिंग), चित्रांची सजावट, छपाईचा कागद, त्याचा रंग, ग्रंथाची किंमत... अशाही गोष्टी व्यंजक ठरण्याचा मार्ग मोकळा होईल ! परंपरागत शब्दार्थनिष्ठ ध्वनीच्या संकल्पनांपलीकडची ही ध्वनिसंकल्पना मांडून सिद्ध करण्यासाठी लेखिकेने एक नवा *ध्वन्यालोक* लिहावा, ही काळाची गरज आहे. (आनंदवर्धन आता शिळा झाला !)

**संस्कृत ग्रंथकाराची साहित्यदृष्टी**

इतकी सूक्ष्म दृष्टी प्राचीन संस्कृत ग्रंथकारांना नसावी. त्यांनी काव्य, म्हणजे साहित्य, हे शब्दार्थघटित असल्याचे सांगितले आहे. साहित्य म्हणजे सहयोग हा या संज्ञेचा मूळ अर्थ त्याचे शब्दार्थात्मक स्वरूप सूचित करणारा आहे. हे घटकावयव गुणयुक्त आणि दोषरहित असावेत, प्राय: अलंकारयुक्त असावेत, असे सांगून गुण, दोष आणि अलंकार यांचे स्वरूप त्यांनी विशद केले आहे. मम्मट सांगतो : *'तददोषौ शब्दार्थौ सगुणौ, अनलंकृती पुन: क्वापि'*, आणि त्याने व्यंग्यार्थाच्या महत्त्वानुरोधाने काव्याचे तीन प्रकार केले आहेत : उत्तम (व्यंग्यप्रधान), मध्यम (गुणीभूतव्यंग्य) आणि अधम (अव्यंग्य, व्यंग्यरहित.) त्यांच्या अनुरोधाने (पण चढत्या क्रमाने) शब्दांचे वाचक, लाक्षणिक आणि व्यंजक असे तीन प्रकार आहेत, आणि त्यांच्या शक्तींचे अभिधा, लक्षणा आणि व्यंजना असे तीन प्रकार केले आहेत. या सगळ्या विवेचनात शब्दार्थांहून अन्य घटक कोठेही येत नाही. अभिनय, वेशभूषा इत्यादी गोष्टी रंगभूमीवर येणाऱ्या नाटकाच्या संदर्भात येतात; त्याचा जो साहित्यात्मक आधार, त्यात केवळ शब्दार्थ हेच घटकावयव असतात. काव्यवाचनातही वाचिक अभिनय असेल (आणि तो असणे स्वाभाविकही आहे) तर तो भाग साहित्यसंकल्पनेच्या बाहेरचा ठरेल.

**उपसंहार : संगणकावर ग्रंथनिर्मिती**

गेली काही वर्षे ग्रंथांची अक्षरजुळणी संगणकावर होऊ लागली आहे. संगणकाने या क्षेत्रात क्रांती केली आहे, हे खरे असले, तरी छपाईच्या कामात चुकांचे प्रमाण वाढले आहे. शुद्ध छपाईत कच्ची मुद्रिते तपासणाऱ्याचे (प्रूफरीडर) काम फार महत्त्वाचे असते. हा वर्गच आता प्राय: नामशेष झाला आहे. त्यामुळे काही अपवादात्मक प्रकाशने सोडली, तर आजकालचे मुद्रित ग्रंथ चुकांचे आगर म्हणावे असे असतात. प्रस्तुत समालोचनाचा विषयभूत ग्रंथ अशा वर्गात मोडणारा आहे. एकेका पानावर डझनांनी मोजाव्या अशा चुका आहेत. रु-रू, स्र-स्त्र, ऱ्हस्व-दीर्घ, त-त्त, द्ध-ध्द अशासारखे गोंधळ अगणित आहेत. व्यंग-व्यंग्य, श्लोक-श्लोक, खड्ग-खड्‌ग असेही

गोंधळ काही कमी नाहीत. 'लख्खकन्'' (पृ. ४६) या लेखनाच्या शैलीत 'बुध्धी' (बुद्धी) असे लेखन करावे लागेल. संस्कृत शब्दांची जोड-तोड हीही स्वैर आहे. अशा अपमुद्रितांमुळे काही-जागी मूळ शब्द उकलेनासा होतो. 'अधरांचा सुमडाव' (पृ. ४७) हे मुद्रण या प्रकारचे आहे. संस्कृतातल्या अवतरणांत तर कल्पनातीत गोंधळ होऊ शकतात, - झाले आहेत. *ध्वन्यालोकातले* एक अवतरण 'सुप्तङ्वचनसम्बघै स्तथा' (पृ. ४०) असे रूप घेऊन अवतरले आहे. संस्कृत पुरेसे न येणारे वाचक हेच प्रमाण-लेखन समजतील. अशी किती उदाहरणे द्यावी ? संगणकयुगात शुद्धमुद्रित ग्रंथ विरळा झाले आहेत. ('अंतर्नाद' मासिक, 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक असे काही अपवाद आहेत. माझे संगणकावर जुळणी केलेले मुद्रित ग्रंथ- 'मराठी व्याकरणाचा इतिहास', 'काव्यप्रकाश १-२-३' इत्यादी- अपवादात्मक वर्गात मोडतील.) असे मुद्रणदोष बाजूला ठेवले, तरी या ग्रंथाच्या वाचनात, विशेषतः सिद्धान्तविवेचनात, जाणवते ते हे की यात मराठीपण कमी आहे. 'पारिभाषिक संज्ञासूचि' या परिशिष्टाचा, ग्रंथ समजण्यात काही प्रमाणात उपयोग होण्यासारखा आहे. पण त्यातही संस्कृत अवतरणे येतात (उदा० 'औचित्य' या शब्दावरील टिपेत उद्धृत केलेले आनंदवर्धनाचे आणि क्षेमेंद्राचे अवतरण) ती अन्य अवतरणांप्रमाणे संस्कृतज्ञाला बोचणारी असतात. संस्कृत विषयावरचा ग्रंथ छापायचा तर संबद्ध कार्यकर्त्यांना संस्कृताची पुरेशी माहिती हवी. हे सर्वच भाषांना उपपन्न आहे. ■

2, देवांगिनी, 1192, शुक्रवार पेठ, पुणे 411002. दूरभाष 020-24479419

## स्वतंत्र जीव

मुलांना थोडी (विशिष्ट मर्यादेपर्यंत) मनमानी करू द्या की, तसं केल्यानं थोडा त्रास पडतो. पण मुलं खूप काही शिकतात, परिपक्व बनू लागतात. मुलांना त्यातून अमर्याद, मनसोक्त आनंद मिळतो. 'शिस्त' हाच शब्द शब्दकोशात असणाऱ्या पालकांची मुलं म्हणजे केवळ मशीन्स ! पालकच जर मुलांचे निर्णय घेऊ लागले तर मुलं स्वावलंबी कशी होणार ? लहानपणीच मुलांना सवयी लागतात, सर्वत्र फिरण्याने, वस्तू 'एक्स्प्लोअर (explore) करण्याने त्यांना खूप बरं वाटतं. पण हे जर इतरांकडून त्यांच्यावर लादलं गेलं तर ? त्यांना ते नक्कीच आवडणार नाही. ते स्वतंत्र जीव आहेत. आपल्यापासून बनले म्हणून आपले नाहीत हे पालकांनी समजून घ्यावे.

चिन्मय कुलकर्णी, इयत्ता ७ वी, अक्षरनंदन शाळा, पुणे १६.
अक्षरमुद्रा वार्षिक अंक, पृ. १०४

# वाङ्मयीन शैली

कृष्णा चौधरी

[परीक्षित पुस्तक : वाङ्मयीन शैली : तरंग अंतरंग. डॉ. सुरेश भृगुवार. दिलीपराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे २२५. किंमत रु. २२५]

मूळचे चंद्रपूरनिवासी व नंतर वाराणसी येथील काशी हिंदू विश्व विद्यालयातील सेवानिवृत्त मराठी विभागप्रमुख प्रा. डॉ. सुरेश भृगुवार यांचा काव्यशैलीवरील लेखांचा हा संग्रह आहे. डॉ.द.भि. कुलकर्णी यांच्या रसोद्ग्राही व चिंतनगर्भ प्रस्तावनेमुळे त्याच्या मौलिकतेत भर पडलेली आहे. प्रस्तुत ग्रंथ शैलीशास्त्रावरील प्रबंध नसून, शैलीशास्त्रावर लिहिलेल्या मोजक्या समीक्षालेखांचा संग्रह आहे. या लेखांत लेखकाने, केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी, भा.रा. तांबे, चंद्रशेखर, आरती प्रभू, सुरेश भट व ग्रेस या कवींच्या कवितेतील सौंदर्य उलगडून दाखविलेले आहे. 'कवितेची भाषाशैली', 'श्रावणमास', 'शब्दकळा', 'जाहिरातीची शैली' हे लेख शैलीशास्त्र या संज्ञेचा अर्थ स्पष्ट करून शैलीशास्त्रीय उपायांचे विवेचन करतात. 'कवितेची भाषाशैली' या लेखात बाह्यरचनेत बदल, छंदोबद्ध काव्यरचना, शब्दांचे नादसामर्थ्य, व्युत्क्रम, शब्दविचलन, शब्दलोप, प्रत्ययरहित शब्द, अपूर्ण वाक्ये, पर्यायी शब्दयोजना व शब्दविवेक इ० प्रयुक्त्या योजून प्रतिभासंपन्न कवी आपला रूपबंध घडवित असतो, असे प्रतिपाद्य आहे. याच लेखात शैलीलक्षणांचा (आवृत्ती, शब्दविवेक, समानार्थक शब्द, नवनिर्मित शब्द, नकार इ०) विस्तृत विचार केलेला आहे.

कवी हा समीक्षक असतो व समीक्षकही कलावंतच असतो. राजशेखराने समीक्षकांचे अरोचकी, सतृणाभ्यवहारी, मत्सरी व तत्त्वाभिनिवेशी असे चार प्रकार सांगितले असून डॉ. भृगुवार हे तत्त्वाभिनिवेशी समीक्षक आहेत. त्यांनी बालकवींच्या 'श्रावणमास' कवितेतील सौंदर्यानुभूतीतील लयबंध शैलीउपायांनी उलगडून दाखविला आहे. 'हरिभगिनी' या गतिशील लयीचा उल्लेख करून संगीतातील शब्दषड्जाचा उल्लेख एक प्राणीसदृश एकसंध कलाकृती म्हणून केलेला आहे. लेखकाने आवृत्तिव्युत्क्रम, शब्दविवेक, विशेषणे, समानार्थक शब्द, लयबद्धता इ० शैलीउपायांतून कवीची शैली कशी अभिव्यक्त होते याची चर्चा विश्लेषणात्मक पद्धतीने केलेली आहे. 'शब्दकळा'

या लेखात तुकारामाच्या 'आम्हा घरी धन' या अभंगाचा उल्लेख करून शब्दकळेविषयी रीड, विनिफ्रेड, नोवाटनी, बोल्टन, सुधीर रसाळ इ० समीक्षकांची शब्दकळेविषयी मते नोंदवून केशवसुत, लक्ष्मीबाई टिळक, चंद्रशेखर, बालकवी, तांबे, यशवंत, मर्ढेकर व नारायण सुर्वे इ० कवींची अवतरणे देऊन शब्दयोजनेच्या बारा प्रकारांनी काव्यकृती सिद्ध होते, असे प्रतिपादले आहे. लेखकाच्या मते कवी ध्वनिविचलित रूपे, प्रत्ययरहित द्वितीया, तृतीया, चतुर्थी, सप्तमी, क्रियांची कालदर्शक रूपे, प्रती जोडून, विशिष्ट शब्द, सामासिक शब्द व विशेषणे इ० बारा प्रकारांच्या शब्दांचा वापर प्रसंगानुरूप करीत असतो. कविप्रतिभेमुळे जुन्या शब्दांना नव्या अर्थाची संजीवनी लाभून विस्मृत शब्दांचे पुनरुज्जीवन होत असते.

'वाग्वैजयंतीतील वृत्तविवेक' या लेखात वर्णिक, मालिक व मराठी अक्षरछंदांचा विचार करून केशवसुत व गोविंदाग्रज यांच्या अक्षरगणवृत्तांचा व मात्रावृत्तांचा तौलनिक अभ्यास केला आहे. गोविंदाग्रजांनी वाग्वैजयंतीतील चाली पूर्वसूरींच्या कवितांतून व तत्कालीन लोकप्रिय गीतांतून घेतल्या आहेत, असा लेखकाचा निष्कर्ष आहे. केशवसुतांच्या कवितेत अक्षरगणवृत्तातील व मात्रावृत्तातील कवितांचे प्रमाण सारखे आहे. गोविंदाग्रजांचा कल मात्र मात्रावृत्ताकडे झुकलेला आहे. वृत्त व शब्द यांच्या साहचर्य संबंधातून व वृत्ताच्या भावानुकूल निवडीतून गोविंदाग्रजांच्या कवितेची निर्मिती झाली. क्षेमेंद्राने आपल्या 'सुवृत्ततिलक' या ग्रंथात अक्षरगणवृत्तांची विस्तृतचर्चा केलेली असून विशिष्ट भावाभिव्यतीसाठी विशिष्टवृत्त कसे उचित ठरते, हे दाखवून दिलेले आहे. उदा० अनुष्टुभ. कवी जसा शब्दांची निवड करतांना औचित्यविवेक वापरतो, तसेच भावानुकूल वृत्ताची निवड करण्यातही त्याचे औचित्य दिसून येते व त्यातून त्याची शैली प्रकटते असे साधार विश्लेषण लेखकाने केलेले आहे. अनुष्टुभ हे वृत्त महाकाव्याचा आरंभ, कथाविस्तार व शम उपदेश करण्यासाठी, वसंततिलका वीर व रौद्र रसाच्या संकरासाठी, पृथ्वी वर्षाकालीन प्रवासासाठी, तर शार्दूलविक्रीडित शौर्य व स्तुतीसाठी उपयोजिले जात होते, असे क्षेमेंद्राचे प्रतिपादन आहे. डॉ.भृगुवारांनी 'निर्दय बालेस' या कवितेतील चार ओळी मूळ मात्रावृत्त बदलून 'शार्दूलविक्रीडित' या अक्षरगणवृत्तात रचून भावाभिव्यक्तीत कसा फरक पडतो, हे दाखविले आहे. अक्षरगणवृत्ते आज कालबाह्य ठरली तरी मात्रावृत्तांचे विलक्षण आकर्षण आजच्या कवींनाही आहे. परिशिष्टात 'वाग्वैजयंतीतील वृत्तविवेक' या अंतर्गत गोविंदाग्रजांनी योजिलेल्या वृत्तांचा वर्गीकरणतक्ता जोडलेला आहे. 'अर्वाचीन मराठी बीजकवी' या लेखात, आधुनिक मराठी कवितेत फक्त केशवसुतांनाच 'बीजकवी' संबोधले जावे, हे लेखकाला मान्य नसून, केशवसुतांबरोबरच रे. टिळक, गोविंदाग्रज, बालकवी व बी या सर्वांना बीजकवीच

संबोधले जावे असे म्हटले आहे. कारण प्रत्येक प्रतिभावंत कवीचा प्रतिभाधर्म स्वतंत्र असतो. आपल्या मतप्रतिपादनार्थ केशवसुतांवर लिहितांना केशवसुतांनी टिळकांपासून स्फूर्ती घेतली, अशी मोरो केशव दामल्यांची साक्षही लेखकाने काढलेली आहे. इथे कुणी कुणापासून स्फूर्ती घेतली हा मुद्दा गौण असून केशवसुतांच्या कवितेत भावानुभवांच्या सौंदर्यपूर्ण घटक-संबधांतून प्रथमतः इहवादी दृष्टिकोण – व्यक्तिस्वातंत्र्य, विवेकनिष्ठा व बुद्धिवाद प्रकर्षाने व्यक्त झाला. केशवसुतांची कविता जशी जीवनानुभवांचा विविध व व्यामिश्र पातळ्यांवर सौंदर्याविष्कार करते, तशी या सर्व कवींची करते का ? विशेषतः आपल्या नव्या प्रतिभाधर्माची ओळख केशवसुतांना झालेली होती, त्यामुळेच त्यांनी कवीच्या आंतरप्रतीतिधर्मावर, काव्यनिर्मितीच्या प्रक्रियेवर व आस्वादप्रक्रियेवरही कविता लिहिल्या. नव्या युगाची, नव प्रतीतीची तशी जाणीव केशवसुतांइतकी इतर कवींत दिसत नाही, म्हणून केशवसुत कविकुलगुरु. शिवराय निघून गेल्यानंतर त्यांच्या लाल किल्ल्यात फक्त फिरणेच आमच्या नशिबी आले असे गोविंदाग्रजांनी उगाच का म्हटले ? केशवसुतांपुढील वास्तव वेगळे होते व त्या वास्तवाकडे पाहण्याचा केशवसुतांचा दृष्टिकोणही सर्वस्वी वेगळा होता, म्हणून ते युगकवी व बीजकवी. मर्ढेकरांनीसुद्धा कालानुक्रमे आधुनिक कवी म्हणून केशवसुतांचे बीजकवित्व मान्य केले व प्रतिभाधर्माने एकच कवी झाला तो म्हणजे बालकवी असे प्रतिपादन केलेले आहे. बीजकवीचे व्यक्तिमत्त्व बहुपेडी व बहुआयामी असे व्यामिश्र असावे लागते, तसे टिळक, गोविंदाग्रज व बालकवींचे होते का ? असा प्रश्न पडतो व केशवसुतांचे एकमेवाद्वितीयत्व अधिकाधिक जाणवत जाते.

'काव्यशैली' या लेखात लेखकाने शैलीउपायांचे विस्तृत विवेचन केलेले आहे.

लेखकाने शैली उपायांचे शब्दप्रधान, रचनाप्रकार व अर्थप्रधान अशा तीन गटांत वर्गीकरण केले आहे :

(अ) शब्दप्रधान - (१) आवृत्ती (२) शब्दविवेक (३) समानार्थकशब्द (४) नवनिर्मित शब्द (५) नकार.

(ब) रचनाप्रकारप्रधान - (१) समानान्तरता (२) लयबद्धता (३) उत्तरगर्भ प्रश्न (४) क्रमविपर्यय (५) विरामचिन्हे.

(क) अर्थप्रधान - (१) अलंकार (२) अन्यधर्मारोप व मानुषीकरण (३) संदिग्धता (४) संदर्भोल्लेख व अवतरणे (५) वाक्प्रचार व म्हणी (६) विचलन. लेखकाने पद्मा लोकुर, सुरेश भट व ग्रेस यांच्या कवितेतील सौंदर्यानुभूतीचे उपर्युक्त शैलीशास्त्रीय अनुबंधाने विश्लेषण केलेले आहे. या लेखांवरून लेखकाच्या ठिकाणी उत्तम दर्जाची रसिकता आहे हे दिसून येते. 'जाहिरातीची शैली' या लेखात

जाहिरातीच्या शैलीला, साहित्यातील शैलीउपायांहून वेगळे निकष लावता येतील का, असा प्रश्न उपस्थित केलेला आहे. 'प्राचीन मराठी साहित्यातील काळरात्र' आणि 'तांबे व चंद्रशेखर' हे दोन्ही लेख तपशील नोंदणारे व बृहन्महाराष्ट्राच्या प्रेमातून लिहिले गेलेले आहेत. 'जन्मपाश' व 'नाही कशी म्हणू तुला' या दोन कवितांतील सौंदर्यसंबोध उलगडून दाखवतांना भृगुवारांची रसिकता प्रगटली आहे. इथे आस्वादप्रक्रियेने सर्जनशीलतेचे रूप घेतले आहे.

असा हा भृगुवारांचा रसिकता व पांडित्य यांचा संगम झालेला ग्रंथ. प्रस्तावनाकार डॉ. द.भि. कुळकर्णी यांनी शैलीशास्त्र फक्त भाषाविज्ञानाशी बांधण्यापेक्षा सौंदर्यशास्त्र व साहित्यशास्त्राच्या अनुषंगाने त्याचा विकास व्हायला हवा असा विचार मांडलेला आहे. सौंदर्यशास्त्रात कलेचे तत्त्वज्ञान, कलानुभव, मूल्यनिर्णयन, कलानिर्मिती व कलेची व्याख्या इ०चा विचार प्रामुख्याने करण्यात येतो. तसा शैलीशास्त्रातही झाला पाहिजे. सौंदर्यशास्त्रातील कलानिर्मितीच्या प्रक्रियेचा व आस्वादप्रक्रियेचा विचार शैलीशास्त्रानुसार करणे म्हणजे शैलीशास्त्राने आपला स्वधर्म सोडणे नव्हे, उलट शैलीशास्त्र जेव्हा भाषाविज्ञानासह सौंदर्यशास्त्राची कास धरेल, त्या वेळी कलानिर्मितीत निर्मितिप्रक्रियेच्या व आस्वादप्रक्रियेच्या कक्षा अधिकच रुंदावतील. ■

शिवाजीनगर, वरूड, जि. अमरावती.
भ्रमणभाष : 9421825045

## चुकीची दुरुस्ती

अंक : २६.२ (उन्हाळा, २००८)

| पृष्ठ | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| १ | ३ | गुडे सो | गुड शो |
| १ | खालून २ | ९७ वर्षांनी | ९७ वर्षांनी) |
| ३ | २ | | |
| ३७ | खालून १ व ६ | दृष्य | दृश्य |
| ३७ | खालून २ | रकृ | र. कृ. |
| ३९ | १ | ६२-६३ | ६०-६१ |
| ७२ | ६ | रांधाओवटी | रांधाओवरी |
| ७८ | १७ | स्मृतिप्रित्यर्थ | स्मृतिप्रीत्यर्थ |

(संदर्भ : भाषा आणि जीवन : अंक २५.४ दिवाळी २००७)

(१) स्वल्पविराम - 'की'च्या आधी की 'की' नंतर ?

स्वल्पविराम 'की' या अव्ययाच्या आधी यावा की नंतर याबद्दल 'शुद्धलेखन शुद्धमुद्रण शब्दकोश' (दि पूना प्रेस ओनर्स ॲसोसिएशन १९६१:४४) असे म्हणतो की हे स्वरूपबोधक, व पक्षान्तरबोधक किंवा परिणामबोधक अव्यय आहे. स्वरूपबोधक असेल तर 'की' पुढे स्वल्पविराम द्यावा.

उदा० ''तो म्हणाला की, मी येईन.'' पक्षांतरबोधक किंवा परिणामबोधक असेल तर 'की' च्या मागे स्वल्पविराम द्यावा. उदा० ''मी जाऊ, की तू जाशील ?'' ''वारा आला, की पाऊस पडतो.''

(२) त्यानंतरच्या रावसाहेब काळे यांच्या शंकांची उत्तरे रावसाहेब काळे यांनाही माहीत असावीत. अनुस्वाराच्या ऐवजी परसवर्ण लिहिण्याचा पर्याय मराठीच्या प्रमाण-लेखनात उपलब्ध आहे. त्यामुळे 'डुंबरे' हे नाव 'डुम्बरे' असेही लिहिता येते.

(३) पीएच.डी. इ० पदव्यांमध्ये शेवटचे अ-कारान्त अक्षर व्यंजनान्त लिहिणे मान्य लेखनानियमांनुसार चूक आहे. ■

-प्र. ना. परांजपे



शंकर चाफाडकर

(१) सृजन व सर्जन या शब्दांच्या अर्थामध्ये काही भेद आहे काय ? लेखक सृजनशील असतो की सर्जनशील ?

(२) फिक्शन व नॉनफिक्शन यांच्यासाठी साहित्याच्या संदर्भात कोणते शब्द वापरावेत? उदा० वाचनालयात विभागवार साहित्यासाठी निर्देशक पट्ट्या लावायच्या असल्यास 'फिक्शन' व 'नॉनफिक्शन'साठी योग्य मराठी शब्द कोणते ? 'ललित'मध्ये सर्व साहित्य येऊ शकते तसेच 'काल्पनिक'मध्ये मनोरंजक, रहस्यमय आदी पण येऊ शकते.

(३) परफॉर्मिंग आर्ट्स व नॉन-परफॉर्मिंग आर्ट्ससाठी अर्थवाही मराठी शब्द कोणते? ''ललितकला'' हा शब्द सर्वसमावेशकच वाटतो. ■

द्वारा - सौ. वैजयंती विश्वनाथ गर्गे, अ/103, श्री गणेश आर्केड, न्यू गुड्स-शेड रोड, बेळगाव 590001, (कर्नाटक). दूरभाष : 0831-6516941

(१) सृजन - सर्जन यांपैकी कोणता शब्द बरोबर ?

निर्मिती [creation] या अर्थाने असलेला 'सर्जन' हा शब्द अलीकडे बरेचदा 'सृजन' असा लिहिला-बोलला जातो. या दोन शब्दांपैकी कोणता शब्द बरोबर ही शंका कित्येकांच्या मनात असते. यांपैकी 'सर्जन' हा शब्द व्याकरणदृष्ट्या बरोबर आहे. मूळ धातू सृज् (सकर्मक क्रियापद, सहावा गण, परस्मैपद. अर्थ : उत्पन्न करणे, निर्माण करणे.) सृज् पासून सिद्ध झालेल्या सर्ज् या आख्याताला प्रत्यय लागून त्याची रूपे सिद्ध होतात. उत्सर्जन, विसर्जन ही अशीच आपल्याला नित्य परिचयाची असलेली रूपे होत. (इथे सृज् > सर्ज् ला अनुक्रमे उत् आणि वि हे उपसर्ग लागले आहेत.) तर्पण, आकर्षण, सर्प हे असे आणखी काही शब्द. हे शब्दही तृप्, आ + कृष्, सृ या धातूंपासून सिद्ध झालेले आहेत.

हे सर्व शब्द आपल्या भाषेत सुखाने रुळलेले असताना एकट्या 'सर्जन' बद्दलच 'सृजन' की 'सर्जन' अशी शंका का यावी ? तर, मला वाटतं - (हे मात्र गमतीनं) इंग्रजीत शल्यविशारदासाठी 'सर्जन' हा शब्द आहे. मराठीत आपण 'शल्यविशारद' न म्हणता सर्रास 'सर्जन'च म्हणतो. मग गल्लत नको म्हणून तर मूळ सर्जन (निर्मिती) शब्द 'सृजन' झाला नसेल ना - 'कृपण', 'पृथक'च्या धर्तीवर ?

माझ्या एका परिचितांच्या मुलाचं नाव त्यांनी ठेवलंय 'सृजन'. पण वास्तविक 'सर्जन' हा शब्द व्याकरणदृष्ट्या अचूक हे कळल्यावर ते म्हणाले, ''अरे ! आता काय करायचं ?'' मी म्हणाले, ''काही नाही. त्याला वैद्यकीय शाखेला जाऊ द्या. तो शल्यविशारद झाला की झालाच सर्जन.''

**विजया देव**

(२) 'परफॉर्मिंग आर्ट'साठी कोणता शब्द ?

ज्या कलांना प्रयोगाशिवाय (म्हणजे मंचावरील सादरीकरणाशिवाय) पूर्णता येत नाही अशा कला म्हणजे परफॉर्मिंग आर्ट्स. नाटक, नृत्य, संगीत या अशा कला आहेत. १९७० व ८० या दशकांत त्यांच्यासाठी 'प्रयोगशरण कला' असा शब्द वापरला जाऊ लागला. काही वेळा 'प्रयोगक्षम' या शब्दाचा वापर करण्यात येतो. पण आता या दोन्ही शब्दांऐवजी 'प्रयोगजीवी' हा शब्द मान्यता प्राप्त करू लागला आहे. 'प्रयोगजीवी' म्हणजे प्रयोगातच किंवा प्रयोगामुळेच जीवित होणाऱ्या कला.

(३) फिक्शन-नॉन्‌फिक्शन

'फिक्शन'साठी 'ललित लेखन' आणि 'नॉनफिक्शन'साठी 'ललितेतर लेखन' असे प्रतिशब्द मराठीत सर्वसाधारणपणे वापरले जातात. पण ते अनेक संदर्भांत समाधानकारक वाटत नाहीत. ललित गद्याच्या विविध प्रकारांचे (उदाहरणार्थ, लघुनिबंध, गुजगोष्ट, ललित निबंध, चरित्र, आत्मचरित्र, प्रवासवर्णन, आठवणी, व्यक्तिचित्र, ललित लेख या साऱ्यांचे) 'ललितेतर' असे वर्गीकरण करणे अनेकांना मान्य होणार नाही. याचा अर्थ असा की इंग्रजी 'फिक्शन'पेक्षा मराठीतील 'ललितलेखन' ही संज्ञा अधिक व्यापक आहे. म्हणून मराठीमध्ये 'ललित लेखन' या संज्ञेचे अधिक सूक्ष्म वर्गीकरण आवश्यक ठरते. 'कल्पनाधिष्ठित ललित लेखन' व 'वास्तवाधिष्ठित (किंवा अनुभवाधिष्ठित) ललित लेखन असे वर्ग कल्पिल्यास कथा, कादंबरी इत्यादींना पहिल्या वर्गात (कल्पनाधिष्ठित ललित लेखन) ठेवून इरावती कर्वे, दुर्गा भागवत, गो.वि. करंदीकर इत्यादींचे ललित निबंध; अनंत काणेकर, रा.भि. जोशी, गंगाधर गाडगीळ इत्यादींची प्रवासवर्णने अशा ललित गद्य लेखनाला 'वास्तवाधिष्ठित ललित लेखन' असे म्हणता येईल. ('कल्पनाधारित' व 'वास्तवाधारित' किंवा 'कल्पनानिष्ठ' व 'वास्तवनिष्ठ' असेही शब्द वापरणे शक्य आहे.)

■

**प्र. ना. परांजपे**

## छोट्या भाषांसाठी कार्य

मौखिक परंपरेतून चालत आलेल्या साहित्याचे दस्तावेजीकरण करणे, त्या त्या भाषांतील सचित्र शब्दसंग्रह तयार करणे, शब्दकोश तयार करणे, अभ्याससाहित्य निर्माण करणे, पाठ्यपुस्तके तयार करणे, या भाषांमधून लघुनियतकालिके तयार करणे, या छोट्या भाषा शिकविण्यासाठी शिक्षकांना प्रशिक्षण देणे इत्यादी कामे केंद्रीय भाषा संशोधन संस्था छोट्या भाषांसाठी करते.

डॉ. के. एस्. राज्यश्री, 'दै. सकाळ' २८ मे २००८

# महाराष्ट्र-दिन

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषदेतर्फे महाराष्ट्र-दिनाचे औचित्य साधून गुरुवार, १ मे २००८ रोजी शिक्षणाच्या मराठी माध्यमाचे महत्त्व सांगणारे अनुभव-कथन, महाविद्यालयीन वार्षिक अंक (२००६-०७) स्पर्धेचे पारितोषिक-वितरण आणि मराठी अभ्यास परिषदेच्या संकेतस्थळाचे उद्‌घाटन असे तीन कार्यक्रम घेण्यात आले. प्रमुख पाहुणे होते सुप्रसिद्ध लेखक अच्युत गोडबोले. या कार्यक्रमांतील अनुभव-कथनात ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्ते व लेखक अनिल अवचट आणि 'अक्षरनंदन' शाळेच्या एक संचालक प्रा. वंदना भागवत यांचा विशेष सहभाग होता. एस.एम. जोशी सभागृहात झालेल्या या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे होते.

कार्यक्रमाच्या प्रास्ताविकात कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी सर्वांचे स्वागत केले. मराठी अभ्यास परिषद मराठीच्या विकासाला चालना देणारे कार्यक्रम सातत्याने करीत असते, असे सांगून परिषदेचे कार्य तरुण पिढीपर्यंत पोहोचावे यासाठी परिषदेचा प्रयत्न आहे, असे त्या म्हणाल्या. त्यांनी मान्यवर पाहुण्यांचा परिचय करून दिला. अध्यक्ष प्र.ना. परांजपे यांच्या हस्ते पाहुण्यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले.

'मराठी माध्यमातून शिक्षण' या विषयावरील अनुभव-कथनात अनिल अवचट यांनी प्रसिद्ध लेखक शॉ, तत्त्वज्ञ थोरो यांचे संदर्भ देऊन मुलांची विचारशक्ती पालकांनी स्वत:च्या ताब्यात घेऊ नये, स्वत:चे मार्ग शोधण्याचे स्वातंत्र्य मुलांना द्यावे, असे सांगितले. ''माणूस म्हणून चांगले जगण्यासाठी आपला सांस्कृतिक वारसा प्रत्येकाला समजला पाहिजे. प्रत्येकाला स्वत:ला समजून घेऊन सर्वांसहित निर्भयपणे जगता आले पाहिजे. मराठी माध्यमातून शिक्षण घेतल्यामुळे माझ्या आणि माझ्या मुलींच्या बाबतीत हे यशस्वीपणे घडले आहे,'' असेही त्यांनी सांगितले.

संगणक-क्षेत्राशी घनिष्ठ नाते असलेले, अनेक पुरस्कारप्राप्त पुस्तकांचे लेखक आणि प्रमुख पाहुणे अच्युत गोडबोले म्हणाले, ''माझे शिक्षण मराठी माध्यमातच झाले. आय.आय.टी.त प्रवेश घेतल्यानंतर इंग्रजी सुधारण्यासाठी सहा महिने खूप मेहनत घेतली. मराठी भाषेचा अभिमान जरूर असावा; पण इंग्रजी भाषेच्या ज्ञानामध्ये कमी

पडून चालणार नाही. उच्च शिक्षणासाठी आवश्यक असणारे साहित्य दुर्दैवाने अजून मराठी भाषेत उपलब्ध नाही. त्यामुळे आजच्या जगात तग धरून राहावयाचे असेल तर मराठीवर प्रेम करा; पण इंग्रजी नाकारू नका.''

पालकांशी, विद्यार्थ्यांशी सातत्याने संपर्क असणाऱ्या 'अक्षरनंदन' या मराठी माध्यमाच्या शाळेच्या प्रतिनिधी, २५ वर्षे इंग्रजीचे अध्यापन केलेल्या प्रा. वंदना भागवत म्हणाल्या, ''मराठी माध्यम योग्य की इंग्रजी माध्यम योग्य याबद्दल विचार करताना शिक्षणामागचा दृष्टिकोण नेमका कोणता आहे हे विचारात घ्यायला हवे. भाषा ही संस्कृतीची वाहक असते. 'स्व'ची ओळख त्यामुळे होते. ज्ञानभाषा म्हणून इंग्रजी योग्यच आहे; परंतु आपल्या भाषेत शिक्षण घेणे हे जास्त सोपे आणि बुद्धीच्या विकासासाठी आणि आपल्या समाजाची, संस्कृतीची आणि स्वत:ची ओळख होण्यासाठी आवश्यक आहे.''

या तिघांच्या अनुभव-कथनानंतर अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे यांनी मराठी माध्यमातून शिक्षण घेतलेल्या संपन्न व्यक्तिमत्त्वांचा उल्लेख केला. ते म्हणाले, ''मराठी माध्यमाकडे दुर्लक्ष केले गेले तर मराठी भाषा फक्त बोली भाषा म्हणूनच शिल्लक राहील. मराठीच्या विकासासाठी संगणकक्षेत्रात मराठीचा वापर अधिकाधिक व्हायला हवा. मराठी व्यापक पातळीवर पोचण्यासाठी प्रयत्न करायला हवेत आणि त्यासाठीच परिषदेने संकेतस्थळ सुरू केले आहे. त्यातून प्रसार आणि प्रचार करणे गरजेचे आहे.'' याप्रसंगी www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते उद्घाटन करण्यात आले. संकेतस्थळासाठी चित्तरंजन भट यांनी विशेष सहकार्य केले आहे. त्यांनी पाहुण्यांना त्याबद्दल माहिती दिली. भाषाविषयक जागरण करणाऱ्या 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकातील मजकूर आणि इतर काही कार्यही या संकेतस्थळाद्वारे सर्वदूर पोहोचण्यास मदत होणार आहे.

या कार्यक्रमाचा आणखी एक महत्त्वाचा भाग म्हणजे महाविद्यालयीन वार्षिक अंक स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ. विजेत्या महाविद्यालयांना अच्युत गोडबोले यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आले.

पुणे विद्यापीठाच्या वृत्तपत्र-विद्या विभागाच्या प्रपाठक व पत्रकार डॉ. उज्ज्वला बर्वे, ज्ञानप्रबोधिनीच्या 'छात्र प्रबोधन'च्या संपादिका जयश्री काटीकर आणि विजया चौधरी (निमंत्रक) या परीक्षक-समितीने पुरस्कारार्थींची निवड केली होती.

या स्पर्धेचे हे दुसरे वर्ष. शहर विभाग व ग्रामीण विभाग या दोन स्तरांवर ही स्पर्धा घेण्यात आली. तिच्यात एकूण २६ महाविद्यालयांनी भाग घेतला.

पुरस्काराचे मानकरी

**शहर विभाग**

**प्रथम क्रमांक** : गरवारे कॉलेज ऑफ कॉमर्स, पुणे
यांचा 'श्रीलेखा' हा अंक
(रु. १०००/- आणि प्रशस्तिपत्र)

**द्वितीय क्रमांक** : मुळजी जेठा महाविद्यालय, जळगाव
यांचा 'अजिंठा' हा अंक
(रु. ५००/- आणि प्रशस्तिपत्र)

**ग्रामीण विभाग**

**प्रथम क्रमांक** : बळवंत महाविद्यालय, विटा. जि. सांगली
यांचा 'बळवंत' हा अंक
(रु. १०००/- आणि प्रशस्तिपत्र)

**द्वितीय क्रमांक** : कर्मवीर रामरावजी आहेर कला,
विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय,
देवळा, जि. नाशिक यांचा 'बांधिलकी' हा अंक
(रु. ५००/- आणि प्रशस्तिपत्र)

यावेळी परीक्षकांच्या वतीने डॉ. उज्ज्वला बर्वे यांनी मनोगत व्यक्त केले. गरवारे महाविद्यालयाच्या प्राचार्य शोभा बावडेकर आणि बळवंत महाविद्यालयाचे प्रा. दादासाहेब सनदी यांनी आपले मनोगत व्यक्त करताना पुरस्कार मिळाल्याबद्दल आनंद व्यक्त केला. मराठी अभ्यास परिषदेच्या या प्रेरणादायी उपक्रमाला शुभेच्छा व परिषदेला धन्यवाद दिले. याप्रसंगी त्यांनी प्रशस्तिपत्राऐवजी 'स्मृतिचिन्ह' दिले तर ते महाविद्यालयात दर्शनी भागात ठेवणे सोपे होईल. तसेच पुढच्या वेळी वेगवेगळ्या विभागांतील उत्कृष्ट लेखनालाही (म्हणजे कथा, कविता इ.) पारितोषिके द्यावीत अशा काही सूचना केल्या. प्रा. आनंद काटीकर यांनी आभार मानले. सूत्रसंचालन विजया चौधरी यांनी केले. अनेक मान्यवरांची श्रोते म्हणून उपस्थिती हे या कार्यक्रमाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

■

'सायली', श्रीरंग हाऊसिंग सोसायटी बिबवेवाडी, पुणे 411037
भ्रमणभाष - 9371091442 / 020 - 24210985

# मराठी अभ्यास परिषद

आनंद काटीकर

## वार्षिक सर्वसाधारण सभा - २००७-२००८

भारत इतिहास संशोधक मंडळाचे सभागृह, दि. २२ जून २००८

मराठी अभ्यास परिषदेची, २००७-२००८ या आर्थिक वर्षाची बारावी वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, २२ जून, २००८ रोजी सायंकाळी ५ वाजता भारत इतिहास संशोधक मंडळाचे सभागृह, सदाशिव पेठ, पुणे येथे आयोजित केली होती. गणसंख्येअभावी सभा १५ मिनिटे स्थगित होऊन ठीक ५.१५ वाजता सुरू झाली. सभेच्या अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे होते.

सभेच्या प्रारंभी २००७-०८ या वर्षात दिवंगत झालेल्या मान्यवरांना श्रद्धांजली वाहण्यात आली. कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी या सभेस अनुपस्थित राहण्याची पूर्वसूचना दिलेल्या सर्व सभासदांची नावे वाचून दाखवली आणि काही उपयुक्त सूचना करणाऱ्या सभासदांचे आभार मानले.

त्यानंतर सभेचे विषयपत्रिकेनुसार कामकाज सुरू झाले. यात प्रथम २००७-०८ या वर्षाच्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त वाचून कायम करण्यात आले. या ठरावाची सूचना डॉ. कल्याण काळे यांनी केली तर श्री. श्रीधर देशपांडे यांनी सूचनेला अनुमोदन दिले.

त्यानंतर परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या कार्यवृत्ताचे वाचन करण्यात आले. या कार्यवृत्ताला मान्यता देण्याची सूचना डॉ. अंजली सोमण यांनी मांडली तर अनुमोदन श्री. ल. ना. गोखले यांनी दिले.

कोषाध्यक्ष विजया चौधरी यांनी २००७-०८चा लेखापरीक्षण-अहवाल सादर केला आणि त्याचबरोबर २००८-०९ या वर्षासाठीचे अंदाजपत्रकही सादर केले. या दोन्हीला मान्यता देण्याची सूचना श्री. अरविंद नवरे यांनी मांडली. श्री.विजय पाध्ये यांनी अनुमोदन दिले. आगामी वर्षासाठी अंतर्गत लेखापरीक्षक म्हणून ए.जे. दिघे अँड कंपनी यांची तर कायदेशीर सल्लागार म्हणून ॲड. पराग देशपांडे यांची पुनर्नियुक्ती करण्याच्या ठरावाचे प्रा. आनंद काटीकर हे सूचक होते व अनुमोदक श्री. चित्तरंजन भट होते.

कार्यक्रमपत्रिकेतील विषय संपल्यानंतर आयत्यावेळचे विषय घेण्यात आले. यामध्ये प्रा. मिलिंद मालशे यांनी, आजच्या सर्वसामान्य विद्यार्थ्यांचे लेखन काळजी वाटणारे असल्यामुळे 'लेखन कसे करावे ?' या विषयावर एक कार्यशाळा आयोजित करावी;



अनुक्रमणिका

यामध्ये पत्रलेखन, पुस्तक परिचय-परीक्षण, टिपणलेखन इत्यादी विषयांचा समावेश असावा, अशी सूचना मांडली. श्री. अरविंद नवरे यांनी, टपालखर्च कमी करण्यासाठी निमंत्रणे 'मेघदूत' पोस्टकार्डवर पाठवावी आणि विशेष कार्यक्रमांच्या आयोजनासाठी सभासदांना आर्थिक मदतीचे आवाहन करावे, अशी सूचना केली. श्री. विजय पाध्ये यांनी संगणक आणि आंतरजालाचा अधिकाधिक वापर करून खर्च वाचवता येईल असा मार्ग सुचवला. त्याचप्रमाणे मराठीचा संगणकावर उपयोगी पडणारा शब्दार्थकोश बनवण्यासाठी रु. १०,०००/-ची देणगीही जाहीर केली. कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी आपली संस्था युवकांपर्यंत पोहोचावी यासाठी सर्व सदस्यांनी प्रयत्न करावेत आणि उपायही सुचवावेत असे आवाहन केले. या दृष्टीने डॉ. कल्याण काळे यांनी आपला अंक जनसामान्यांपर्यंत पोहोचावा यासाठी प्रयत्न करावेत आणि त्यासाठी सर्व महाविद्यालये आणि शिक्षक यांच्यापर्यंत पोहोचण्यासाठी प्रयत्न करावेत अशी सूचना मांडली. डॉ. मिलिंद मालशे यांनी सर्व महाविद्यालयांतील मराठी विभागांमध्ये नमुना अंक आणि आवाहनपत्र पाठवून द्यावे अशी सूचना मांडली. श्री. चित्तरंजन भट यांच्या मते आंतरजालावर युवक मोठ्या प्रमाणावर भाषेवर चर्चा करत असतात. आपल्या संकेतस्थळावर अशी चर्चा करण्यासाठी संधी आपण उपलब्ध करून दिल्यास अधिक युवक आकर्षित होऊ शकतील.

या सर्व चर्चेचा आणि सभेचा समारोप अध्यक्ष प्रा. प्र.ना. परांजपे यांनी केला. आपल्या मनोगतात ते म्हणाले, वयाच्या १२व्या-१४व्या वर्षी माणूस वाङ्मयाच्या प्रेमात पडतो, त्यानंतर ती आवड वाढत राहते, रुजते, कधीही नष्ट होत नाही. पण बदलत्या युगात ही आवड निर्माणच होत नाही. त्यामुळे अधिकाधिक तरुणांनी साहित्य वाचावे यासाठी प्रयत्न व्हायला हवेत. मराठी अभ्यास परिषदेचे सभासदत्व नाममात्र शुल्कात विद्यार्थ्यांना देता येईल. 'भाषा आणि जीवन'चा अंक त्यांच्यापर्यंत पोहोचावा, अनेकांनी तो वाचावा यासाठी प्रयत्न व्हावेत. संस्थेचे सभासद वाढवणे, उपक्रम वाढवणे त्यात सहभागी होणाऱ्यांची संख्या वाढवणे याकडे लक्ष द्यायला हवे. काही देणगीदार मिळवून काही महाविद्यालयांना अंक मोफत पाठवावा. टपालखात्याकडून काही सवलती मिळवण्याचे प्रयत्न करावेत. तरुण कार्यकर्त्यांची फळी उभी राहावी यासाठी प्रयत्न करावेत. पैसा नाही ही समस्या नसून मनुष्यबळाचा अभाव ही समस्या आहे, याकडे गांभीर्याने लक्ष द्यायला हवे, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली. उपाध्यक्ष डॉ. मृणालिनी शहा यांनी आभार मानल्यानंतर सभेचा समारोप झाला. ■

**भ्रमणभाष** - 9421610704

**देणग्या**

**प्रा. लीला पाटील** (कोल्हापूर) यांनी परिषदेला रु. ५,०००/- ची देणगी दिली आहे. **श्री. द्वारकानाथ कलंत्री** (पुणे) व **प्रा. नी. ना. रेळेकर** यांनी परिषदेला प्रत्येकी रु. १०००/- देणगी दिली आहे. **श्री. श्रीधर देशपांडे** (पुणे) यांनी परिषदेला एक हजार मेघदूत कार्डे आणि मराठी विश्वकोशाच्या सीडीज देणगीरूपाने दिल्या आहेत. **श्री. विजय पाध्ये** यांनी परिषदेच्या संकेतस्थळावर एका विशेष दालनात एक शक्य तितका निर्दोष ऑनलाइन शब्दार्थकोश उपलब्ध करून द्यावा या सूचनेबरोबरच त्यासाठी येणाऱ्या खर्चासाठी रु. १०,०००/-ची देणगी दिली. शिवाय दहा महाविद्यालयांना 'भाषा आणि जीवन'चा अंक एक वर्ष पाठविण्यासाठी त्यांनी १०००/- रुपयांची वेगळी देणगी दिली आहे.

■

## प्रतिसंज्ञा !

विद्यापीठात एका विषयाचा शिक्षणक्रम तयार करण्यासाठी गेलो होतो. त्यासाठी लागणाऱ्या प्रशिक्षणाच्या संदर्भात इंग्रजीतील 'डेमॉन्स्ट्रेशन' या संज्ञेसाठी 'प्रदर्शन' हा प्रतिशब्द कार्यक्रमात सारखा वापरला जात होता. मी आक्षेप घेतला. विचारले, ''मग तुम्ही 'एक्झिबिशन'साठी कोणता मराठी शब्द वापरता ?'' ''आम्ही तिथेही 'प्रदर्शन'च वापरतो. मी विचारले, 'डेमॉन्स्ट्रेशन' व 'एक्झिबिशन' या दोन्ही संज्ञांच्या अर्थात फरक नाही ?''

''आहे ना ! पण मग कोणते शब्द वापरायचे ?''

मग, चर्चा प्रतिसंज्ञांच्या प्रयत्नांकडे वळली.

आता, नव्या प्रतिसंज्ञा अशा झाल्या.

एक्झिबिशन ----- प्रदर्शन,<br>
डेमॉन्स्ट्रेशन ----- कृतिदर्शन<br>
ओरिएंटेशन ----- पूर्वदर्शन,<br>
पायलटींग ------ पथदर्शन<br>
कशा वाटतात या प्रतिसंज्ञा ?

प्रेषक - रमेश पानसे





अनुक्रमणिका

## भाषाविषयक लेखनसूची (वर्ष २६, अंक २) : पुरवणी

नीलिमा गुंडी

### दैनिकांतील लेख

**कर्वे**, स्वाती/'सर्व काही भाषेसाठी'/महाराष्ट्र टाइम्स/१४ जानेवारी २००७

**परांजपे**, प्र.ना./'सजग भाषाप्रेमींचे संघटन' /दै.सकाळ (पुणे आवृत्ती)/१४ जानेवारी २००७

### नियतकालिकांतील लेख

**गांगल**, दिनकर/'मराठी'चे संवर्धन व संगोपन/रुची/मे २००७/पृ. ४-१०

**'माय** मावशी'/सानेगुरुजी अनुवाद सुविधा केंद्र/दिवाळी २००७

**'मी** मायबोली'/मराठी भाषा संवर्धन प्रतिष्ठान/पुणे/नोव्हेंबर २००७

**वैशंपायन**, मंगेश/'मराठी भाषेचा विचार वर्षातून एकदाच का ?'/साप्ताहिक सकाळ/२४ फेब्रुवारी २००७/पृ. ८-१२

**शेणई**, सुजाता/'मुलाखत - डॉ.अशोक केळकर'/साप्ताहिक सकाळ/२४ फेब्रुवारी २००७/पृ.२७-३२

**'समर्थ** मराठी विशेषांक'/समर्थ मराठी संस्था/पुणे/वार्षिक २००७

**साधु**, अरुण/'लोकहो, महाराष्ट्रात मराठी बोला'/साप्ताहिक सकाळ/२४ फेब्रुवारी २००७/पृ. १०

### पुस्तके

**केळकर**, अशोक रा./'वैखरी' (आवृत्ती २)/स्नेहवर्धन/पुणे

**ढेरे**, अरुणा, भूषण केळकर, दिनकर गांगल (संपा.) 'शोध मराठीपणाचा'/ग्रंथाली/ मुंबई

**भाटवडेकर**, मो.वि./'अर्थच्छटा कोश'/ स्नेहवर्धन/पुणे

**भाटवडेकर**, मो.वि./'व्यावहारिक मराठी शब्दार्थकोश'/राजहंस/पुणे

**सामंत**, सत्त्वशीला, 'शब्दानंद' (इंग्लिश, मराठी, हिंदी - त्रैभाषिक व व्यवहारोपयोगी विषयवार शब्दकोश)/डायमंड पब्लिकेशन्स /पुणे

---

लेखक परिचय

- डॉ. कृष्ण श्री. **अर्जुनवाडकर :** जन्म १९२६. अद्वैत-वेदान्त-कोविद ही पदवी १९४१ मध्ये. १९४६च्या शालान्त परीक्षेत जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती. संस्कृत विषयात एम.ए., स.प. महाविद्यालयात संस्कृतचे १८ वर्षे अध्यापन. मुंबई विद्यापीठात सात वर्षे मराठीचे प्रपाठक. परदेशातही अध्यापन. मम्मटकृत 'काव्यप्रकाश' व मोरो केशव दामलेकृत 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथांचे सटीक, चिकित्सक संपादन. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद', 'मराठी व्याकरणाचा इतिहास', 'मोरो केशव दामले : व्यक्ती आणि कार्य' इ० अनेक ग्रंथ प्रकाशित. साहित्यसम्राट न.चिं. केळकर पारितोषिक, पाणिनी पुरस्कार, कालिदास पुरस्कार, बेहेरे सुवर्णपदक इ० अनेक पुरस्कारांनी सन्मानित.
- आनंद **काटीकर :** औषधनिर्माण निर्माणशास्त्राची पदविका. मराठीमध्ये एम.ए.. गेली आठ वर्षे मराठीचे (गेल्या सहा महिन्यांपासून फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे) अध्यापन.



अनुक्रमणिका






- कृष्णा **चौधरी :** मराठीचे निवृत्त प्राध्यापक. 'झळई व नवकलिका' व 'श्वेतकमळ' हे कवितासंग्रह, 'अग्निकमळ' (या.मु. पाठकांच्या कविता), 'म. फुले : पूर्वसूरी आणि प्रभावळ' हा समीक्षा-लेखसंग्रह. त्याला २००५चा कुसुमानिल पुरस्कार.
- राधा **नेरकर :** बी.एससी. जर्मन भाषेची व पत्रकारितेची पदविका. बँक ऑफ इंडियामधून स्वेच्छानिवृत्त. हिंदी, कोकणी, संस्कृत, गुजराती या भाषांचेही ज्ञान. 'मुंबई महानगर'मध्ये दोन वर्षे व 'बेळगाव तरुण भारत'मध्ये एक वर्ष स्तंभलेखन. 'प्रिय मैत्रीण' या मासिकाच्या काही काळ कार्यकारी संपादक. दैनिकांतून ललित लेखन, पुस्तक परीक्षणे इ. लेखन.
- प्र.ना. **परांजपे :** एम.ए.,पि.जि.डि.टि.इ.,एम.लिट. रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक.
- विजय **पाध्ये :** पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८ पासून उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ. क्षेत्रांतील दस्तावेजांचे इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याचे काम स्वतंत्रपणे करतात.
- डॉ. रमेश **पानसे :** अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजकार्य व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५पेक्षा अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणपत्रिका' मसिकाचे संपादक. 'बाल-शिक्षण संशोधन व विकासकेंद्रा'चे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित. महत्त्वाचे ग्रंथ - 'शिक्षण आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदुसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ' इ.
- रंजना **फडके :** वाडिया महाविद्यालयात २५ वर्षे मराठीचे अध्यापन. तीन कवितासंग्रह प्रकाशित. 'स्पंदन' (२००३), 'जीवनक्षण' (२००४) व 'अंतर्नाद' (२००५). 'जीवनक्षण'ला गदिमा पुरस्कार. पहिले दोन संग्रह ब्रेल लिपीतही प्रकाशित. 'स्त्री साहित्याचा मागोवा'मध्ये लेखन. दोन वेळा आदर्श शिक्षक पुरस्कार. नववीच्या पाठ्यपुस्तकाच्या संपादन-मंडळाच्या सभासद. भारतीय कलावर्धिनी संस्थेच्या अध्यक्ष. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या कार्यवाह.
- डॉ. उज्ज्वला **बर्वे :** पुणे विद्यापीठातून एम.ए.(रशियन),एम.सी.जे.,पीएच.डी. (कम्युनिकेशन अँड जर्नलिझम). सध्या पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन व वृत्तपत्र-विद्या-विभागात प्रपाठक. दूरदर्शनवरील महाचर्चेच्या सूत्रसंचालक. ऑस्ट्रेलियन नभोवाणीसाठी मराठी वृत्तलेखक व निवेदक. दिल्लीवरून ध्वनिक्षेपित होणाऱ्या राष्ट्रीय मराठी बातमीपत्राच्या काही वर्षे वृत्तनिवेदक.
- प्रा. वंदना **भागवत :** लोणावळा येथे इंग्रजीचे २४ वर्षे अध्यापन करून स्वेच्छानिवृत्त. 'अक्षरनंदन' या पुण्यातील शाळेच्या संचालकमंडळाच्या सभासद. परीक्षण, संपादन, भाषांतर या प्रकारचे लेखन.
- प्रा. विश्वास **वसेकर :** सेलू येथील नूतन महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक. बारावीच्या मराठी पाठ्यपुस्तकांच्या संपादक-मंडळाचे सभासद. 'कोरस', 'काळा गुलाब', 'पैगाम', 'शरसंधान' व 'मालविका' असे पाच कवितासंग्रह प्रकाशित.
- सत्त्वशीला **सामंत :** महाराष्ट्र शासनाच्या भाषा-संचालनालयाच्या निवृत्त उपसंचालक. 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' व 'शब्दानंद' हा कोश प्रकाशित.

